कायमची बेकारी म्हणतां येईल तिच्या बाबतींत असें म्हणतां येत नाहीं. ती नाहींशीं करण्याचे प्रवाह आर्थिक व्यवस्थेंत आपसूक निर्माण होत नाहींत. ती नैसर्गिक रीत्या नाहींशीं होत नसल्यानें ती नाहींशीं होईल अशी मुद्दाम खबरदारी न घेतल्यास ती अनंत ठरण्याचा धोका असतो. हा धोका स्पष्टपणें लक्षांत यावा म्हणूनच ' कायमची ' अशा कांहींशा अतिशयोक्तिपूर्ण विशेषणाचा वापर करून तिचें वर्णन करण्याचा प्रघात आहे. त्या वर्णनांतील दोष टाळावयाचा असेल तर असें म्हणतां येईल कीं जी घर्षणजन्य नाहीं व मोसमीहि नाहीं अशी एक विशेष प्रकारची सक्तीची बेकारी आजच्या आर्थिक व्यवस्थेंत आढळते. अशा बेकारीपुरताच कीन्स व त्यांचे अनुयायी ' नाखुषीची बेकारी ' हा शब्दप्रयोग मर्यादित करतात.

## उपभोक्त्यांच्या इच्छेला दिलेलें प्राधान्य

बेकारीच्या वरील विविध प्रकारांपैकीं जी बेकारी नाखुषीची आहे पण जी घर्षणजन्यहि नाहीं किंवा मोसमीहि नाहीं अशाच बेकारीचा संपूर्णतया अभाव पूर्णोद्योगावस्था ह्या कल्पनेंत अभिप्रेत आहे. तशा प्रकारची बेकारी आर्थिक व्यवस्थेंत नसली तर आर्थिक व्यवस्था पूर्णोद्योगावस्थेप्रत पोहोंचली आहे असें म्हणतां येतें. तशा प्रकारची बेकारी आर्थिक व्यवस्थेंत असली तर आर्थिक व्यवस्था अद्याप अल्पोद्योगाच्या अवस्थेंत आहे असें म्हणावें लागतें. पूर्णोद्योगावस्था आहे का अल्पोद्योगावस्था आहे हें ठरवितांना खुषीची बेकारी, मग ती तात्पुरती असो अगर कायमची असो, विचारांत घेतली जात नाहीं. कारण बोलूनचालून ती खुषीची असल्यामुळें तिच्यापासून कोणाचें विशेष कांहीं बिघडत नाहीं आणि ती असण्याचा दोष एकंदरीनें आर्थिक व्यवस्थेकडे जाण्याचें कांहीं कारण नाहीं. खुषीच्या बेकारीप्रमाणेंच घर्षणजन्य व मोसमी बेकारीहि लक्षांत घेतली जात नाहीं. घर्षणजन्य अगर मोसमी बेकारी नाखुषीचीच असते हें खरें. पण एक तर ती तात्पुरती असते आणि शिवाय ती आर्थिक व्यवस्थेंतील प्रवाहामुळें आपोआपच दूर होते. त्यामुळें त्या बेकारीचें गंभीर प्रश्नांत रूपांतर व्हावयाचें कारण नसतें. त्या बेकारीनें पीडित झालेल्यांना काम मिळेपर्यंतच्या काळांत कोणत्या प्रकारें आर्थिक संरक्षण द्यावें एवढया प्रश्नाचा विचार करून कांहींतरी सोय काढली म्हणजे झालें. तेवढ्यापुरतेंच त्या बेकारीकडे आर्थिक व्यवस्थेला लक्ष पुरवावें लागतें. ती बेकारी निवारण्याचा असा स्वतंत्र प्रश्न उद्‌भवत नाहीं. घर्षणजन्य व मोसमी बेकारीच्या बाबतींत आणखी एक लक्षांत ठेवण्याची गोष्ट म्हणजे त्या बेकारीमागील कारणें पहातां असें दिसून येतें कीं ती बेकारी अपरिहार्य अशीच आहे. ज्या आर्थिक व्यवस्थेंत उपभोक्त्यांच्या इच्छेवर उत्पादनाचें स्वरूप अवलंबून असतें, त्या व्यवस्थेंत मागणीच्या आराखड्या-( pattern of demand )मध्यें बदल झाल्यामुळें मधूनमधून कांहीं कांहीं क्षेत्रांत बेकारी असणारच. त्याचप्रमाणें आर्थिक व्यवस्थेंत उत्पादनपद्धतींतील सुधारणावजा बदलांना वाव द्यावयाचा असेल तर नव्या यंत्रांच्या उपयोगामुळें होणारी बेकारी टाळतां यावयाची नाहीं. घर्षणजन्य बेकारी निर्धारानें टाळावयाचीच असेल तर उपभोक्त्यांचें उपभोगस्वातंत्र्य जें आर्थिक स्वातंत्र्यातील अत्यंत मूलभूत स्वातंत्र्य समजलें जातें असें स्वातंत्र्य हिसकावून घेतलें पाहिजे आणि उत्पादनपद्धतींतील श्रमवापर ज्यामुळें कमी होतो असें संशोधन बंद केलें पाहिजे. थोडक्यांत आर्थिक स्वातंत्र्य व प्रगति ह्यांना रामराम ठोकून आर्थिक व्यवस्था खरोखरींच स्थिरप्रकृति ( static ) होईल असें करणें भांडवलशाहीलाच काय पण कोणत्याहि आर्थिक व्यवस्थेला इष्ट नाहीं. ज्या आर्थिक व्यवस्थेंत आपल्याला काय हवें, काय नको हें सांगण्याची संधि मिळत नाहीं ती आर्थिक व्यवस्था बेकारीविरहित असली तरी चांगली आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. कारण गरजा ह्या मूलतः वैयक्तिक असल्यामुळें त्या भागवतांना व्यक्तीच्या इच्छांना प्राधान्य द्यावेंच लागतें. समाजवादांत सुद्धां व्यक्तीच्या इच्छा विचारांत कशा घेतल्या जातील ह्याचा विचार करावा लागतो. असा विचार समाजवादांत योग्य प्रकारें होणार नाहीं हा समाजवादी आर्थिक व्यवस्थेवर भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांकडून आरोप केला जात आहे हें सर्वश्रुत आहे. कोणत्याहि आर्थिक व्यवस्थेला उपभोक्त्यांच्या इच्छेला प्राधान्य देणें जितकें जरूर असतें तितकेंच उत्पादनसाधनांतील श्रमबचतीला कारणीभूत होणाऱ्या संशोधनाला वाव देणें अगत्याचें असतें. गरजा भागविण्याचीं साधनें मर्यादित असल्यामुळें आर्थिक प्रश्न सोडविण्यासाठीं उपलब्ध साधनांचा भरपूर उपयोग करून घेणें हें जसें आर्थिक

व्यवस्थेचें परम कर्तव्य असतें तसेंच उपलब्ध साधनां-कडून अधिकाधिक प्रमाणांत गरजा भागवितां याव्या म्हणून साधनांचा वापर कमी करणाऱ्या सुधारणा घडवून आणणें हेंहि आर्थिक व्यवस्थेचें परम कर्तव्य असतें. तशा सुधारणा म्हणजेच आर्थिक प्रगति. तशा सुधारणांमुळें तात्पुरत्या बेकारीचा संभव असतो पण त्याला इलाज नाहीं. सारांश, घर्षणजन्य बेकारी ही आर्थिक स्वातंत्र्य व आर्थिक प्रगति ह्यांच्याकरतां द्यावी लागणारी किंमत आहे. आर्थिक प्रगति व आर्थिक स्वातंत्र्य ह्या गोष्टी बेकारीच्या संपूर्ण अभावापेक्षां निःसंशय अधिक मोलाच्या असल्यामुळें घर्षणजन्य बेकारी अपरिहार्य धरून चालणें अगत्याचें आहे. घर्षणजन्य बेकारी जशी अटळ समजावी लागते, तशीच मोसमी बेकारीहि अटळ समजावी लागते. मोसमी बेकारी ही तांत्रिक बाब असते. कांहीं प्रकारच्या उत्पादनाचें तंत्र जर असें असलें कीं त्या प्रकारच्या उत्पादनांत वर्षांतील कांहीं भागांत उत्पादनाच्या कार्याला वाव असतो, अशा ठिकाणीं कांहीं इलाजच चालत नाहीं. त्या क्षेत्रांतील लोक ज्या काळांत बेकार असतात तेवढ्याच काळापुरती त्यांना अन्यत्र रोजगारी मिळण्याची व्यवस्था करतां आली तर उत्तमच होईल ह्यांत शंका नाहीं. पण असें करतां येण्याचा संभव फारच कमी असतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तसें करता यावयाचें असल्यास ज्या उत्पादन-क्षेत्राचें स्वरूप मोसमी असतें त्या उत्पादनक्षेत्रांतील कामगारांनीं एकापेक्षां अधिक धंद्यांचें शिक्षण घेऊन तयार असावें लागतें. पण तसें करूनहि त्याचा फायदा त्यांना अगर समाजाला होईल किंवा नाहीं ह्याची शंकाच. त्याचा फायदा कामगारांना होण्याचा संभव कमी. कारण बेकारीच्या नेमक्या काळांत, शिकून ठेवलेल्या कामाला वाव मिळण्याची व्यवस्था नेहमींच होईल असें नाहीं. तसें होणें हा एक योगायोगच आहे. त्यावर अवलंबून रहातां येत नाहीं. शिवाय एकानेंच दोन कामें — कांहीं वेळ हें काम, कांहीं वेळ दुसरें काम — ह्या पद्धतीनें करणें समाजदृष्ट्या इष्ट असेलच असें नाहीं. कारण त्यामुळें कामगाराला कोण-त्याहि कामांत उत्पादनक्षमता प्राप्त होणार नाहीं असा धोका असतो. अनेक कामें पण त्यांतील कोणतेंहि धड नाहीं अशी कामकऱ्यांची स्थिति होऊं देणें समाजाला परिणामीं फायद्याचें नसतें. तेव्हां मोसमी बेकारी अपरि-हार्य मानून ती जेव्हां असेल तेव्हां कामगाराची उदर-निर्वाहाची योग्य तरतूद आहे हें पाहणें एवढेंच समाजानें करणें उत्तम. सारांश, घर्षणजन्य व मोसमी बेकारी ह्या कोणत्याहि आर्थिक व्यवस्थेचा अटळ असा भाग आहेत. त्या निवारण्याच्या प्रयत्नांत आर्थिक व्यवस्थेनें पडण्याची जरूरी नाहीं. पण जी बेकारी नाखुषीची आहे पण घर्षणजन्य अथवा मोसमी नाहीं अशा म्हणजे ज्या बेकारीपुरता 'नाखुषीची बेकारी' हा शब्दप्रयोग मर्यादित करावा अशी कीन्स ह्यांची सूचना आहे, अशा बेकारी-च्या बाबतींत मात्र समाजाला ही वृत्ति स्वीकारतां येत नाहीं. नाखुषीची कायमची बेकारी हा, आर्थिक व्यवस्था उत्पादनाच्या साधनांचा भरपूर उपयोग करून घेत नाहीं, ह्याचा स्पष्ट पुरावा आहे. आर्थिक व्यवस्थेच्या कार्यक्षमतेच्या दृष्टीनें व स्थैर्याच्या दृष्टीनेंहि तशा प्रकारच्या बेकारीचा उद्भव होणार नाहीं हें पाहणें अत्यंत जरूर आहे. बेकारीविरहित आर्थिक व्यवस्था प्रस्थापित करणें किंवा दुसऱ्या शब्दांत पूर्णोद्योगावस्था प्रस्थापित करणें हें भांडवलशाहीच्या नव्या अर्थशास्त्राला मान्य असलेल्या आर्थिक धोरणाचें उद्दिष्ट असतें असें जेव्हां म्हटलें जातें तेव्हां त्याचा रोख घर्षणजन्य अगर मोसमी अगर तात्पुरत्या वा कायमच्या खुषीच्या बेकारीविरुद्ध नसून दीर्घकालीन नाखुषीच्या बेकारीविरुद्ध असतो. थोडक्यांत कीन्सनीं दिलेला अर्थ लक्षांत घेतां नाखुषीच्या बेकारीचा संपूर्ण अभाव म्हणजेच पूर्णोद्योगा-वस्था.

भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेचा प्रमुख दोष बेकारी आहे असें जेव्हां म्हणण्यांत येतें तेव्हां कीन्स-वादी अर्थानें नाखुषीची बेकारी त्या विधानांत अभि-प्रेत असते हें वरील विवेचनावरून स्पष्ट झालें असेलच. नाखुषीची बेकारी भांडवलशाहींत मोठ्या प्रमाणावर नेहमींच असते ह्यावर भांडवलशाहीचें नवें अर्थशास्त्र उभारलेलें असल्यामुळें तशी बेकारी भांडवलशाहींत असते हें ओळखण्याचें गमक काय हा प्रश्न उपस्थित होतो. केवळ बेकारी आहे हें गमक धरतां यावयाचें नाहीं. कारण ती बेकारी घर्षणजन्य अगर खुषीची असूं शकेल. नाखुषीची बेकारी आर्थिक व्यवस्थेंत आहे हें ओळखण्याचें चिन्ह कीन्स ह्यांच्या मतें कमी रहाणी-मान स्वीकारण्याची कामगारांची तयारी असतांनासुद्धां








त्यांना आर्थिक व्यवस्थेंत काम मिळूं शकत नाहीं हें आहे. अस्तित्वांत असलेली बेकारी जर पूर्णपणें घर्षण-जन्य असेल (–मोसमी किंवा खुषीची बेकारी फारशी महत्त्वाची नसल्यानें ती विचारांत घ्यावयाचें कारण नाहीं–) तर कामगारांचें वेतन, पैशांतील अगर रहाणी-मानांतील, कां कमी व्हावें ह्याला कांहींच कारण नाहीं. घर्षणजन्य बेकारी त्वरित नाहींशी न झाली तरी कालां-तरानें ती नाहींशी होते ह्याचें मुख्य कारण म्हणजे ती बेकारी ज्या कारणापासून उद्भवते त्या कारणामुळें काम-गारांच्या मागणी–पुरवठ्याच्या परिस्थितींत कांहीं फरक पडत नाहीं हें आहे. अशा परिस्थितींत मजुरी कमी होण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. मजुरी कमी होण्याचा प्रश्न जेव्हां मजुरांकरितां एकूण मागणी कमी होते किंवा लोकसंख्या वाढल्यामुळें मजुरांचा एकूण पुरवठा वाढतो तेव्हांच उद्भवतो. असा प्रश्न उद्भवला तरी त्यामुळें नाखुषीच्या बेकारीचा गंभीर प्रसंग ओढवत नाहीं. कारण मजुरी कमी झाली कीं ती बेकारी टळते असें रूढ अर्थशास्त्राचें सांगणें आहे. त्या अर्थशास्त्राच्या सिद्धान्तानुसार मजुरी कमी झाली कीं नफा वाढतो, नफा वाढला कीं अधिक मजुरांना कामावर घ्यावयाची प्रवृत्ति उद्योगपतींत निर्माण होते व त्यामुळें रोजगारी वाढून बेकारी खलास होते. एखाद्या प्रसंगीं बेकारी नाहींशी न झाली तर त्यामागें कमी मजुरी स्वीकारावयाची नाहीं हाच कामगारांचा आग्रह असतो. कमी मजुरी स्वीका-रावयास तयार नसल्यामुळें कामगार बेकार राहिले तर त्याला नाखुषीची बेकारी समजावयास रूढ अर्थशास्त्र तयार नाहीं. रूढ अर्थशास्त्राप्रमाणें ती खुषीची बेकारीच. कारण जें वेतन बाजारांतील प्रवाहामुळें ठरतें तें वेतन स्वीकारण्यापेक्षां निकामी राहावें लागलें तरी पर्वा नाहीं अशा कामगारांच्या अडेलतट्टूपणामुळें बेकारी उद्भवते. निराळ्या शब्दांत, काम मिळत नाहीं म्हणून ती बेकारी उद्भवत नसून मिळणाऱ्या वेतनावर काम करावयाची तयारी नाहीं म्हणून ती उद्भवते. तेव्हां ती खुषीचीच बेकारी.

भांडवलशाहीच्या कीन्सवादी अर्थशास्त्राला वरील मीमांसा अजिबात मान्य नाहीं. त्या अर्थशास्त्राचें म्हणणें असें कीं एक तर पैशांतील मजुरी सर्व काम-गारांच्या बाबतींत कमी झाली तरी रोजगारी वाढेलच असें नाहीं. कामगारांची मजुरी कमी झाली कीं त्यांचें उत्पन्न कमी होतें; उत्पन्न कमी झालें कीं त्यांची खरेदी-शक्ति कमी होते; खरेदीशक्ति कमी झाली कीं उत्पादित वस्तूंवर त्यांचा खर्च कमी होतो. त्यामुळें किंमती कमी होऊन नफा वाढण्याची अपेक्षा भंग पावते. अर्थातच सर्वत्र मजुरी कमी झाल्यामुळें बेकारी कमी होईल अशी अपेक्षा करणें व्यर्थ आहे. आणि शिवाय पैशांतील मजुरींत कपात मान्य करावयास कामगार तयार होत नसले तर त्याचा अर्थ असा मुळींच होत नाहीं कीं कामगारवर्ग रहाणीमानांतील कपात स्वीकारावयाची तयारी दर्शवीत नाहीं. मोठ्या प्रमाणावर बेकारी असून-सुद्धां पैशांत मिळणाऱ्या आपल्या उत्पन्नांत कपात स्वीकारावयास कामगार तयार नसतो अशीं दृश्यें आढळतात ही गोष्ट अगदी खरी आहे. पण पैशांतील मजुरींत कपात करण्याचा प्रश्न काढल्यावर उसळून उठणारा कामगारवर्ग त्यांच्या रहाणीमानांत समाविष्ट होणाऱ्या वस्तूंची किंमत (wage-good prices) वाढली तरी ती मूकपणें सहन करतो[1] हीहि गोष्ट खरी आहे. ह्याचाच अर्थ असा कीं रहाणीमानांतील कपात कामगारांकडून स्वीकारली जाते. कामगारवर्गाच्या कांठा-वरील उत्पादनक्षमतेइतकी मजुरांची मजुरी असावी ह्या रूढ अर्थशास्त्राच्या सिद्धान्ताच्या दृष्टीनें पैशांतील मजुरीपे-क्षां रहाणीमानांतील मजुरी अधिक महत्त्वाची आहे. कारण पैशांतील मजूरी व रहाणीमानांतील मजूरी ह्या गोष्टी एकच आहेत असें सिद्ध करतां येण्याजोगें आहे. पैशांतील मजुरी वाढली म्हणजे रहाणीमानांतील मजुरी वाढतेच असें नाहीं – त्याच प्रमाणांत किंमती वाढल्या तर रहाणीमान वाढत नाहीं – किंवा पैशांतील मजुरी कमी झाल्यानें रहाणीमान कमी होतें असें नाहीं – त्याच प्रमाणांत किंमती कमी झाल्या तर तें कमी होत नाहीं. पैशांतील किंमती व रहाणीमान ह्यांचा परस्परसंबंध लावून एकांत वाढ म्हणजे दुसऱ्यांत वाढ, एकांत कपात म्हणजे दुसऱ्यांत कपात असें फक्त जेव्हां कांहीं मजूरांच्या पैशांतील उत्पन्नांत फरक पडतो तेव्हांच

1. "Whilst workers would usually resist a reduction of money wages, it is not their practice to withdraw their labour where there is a rise in the price of wage-goods." — General Theory, p. 9.

म्हणतां येतें. कारण तेव्हां सर्वसाधारण किंमतीमानांत काय फरक पडतो हें विचारांत घ्यावें लागत नाहीं. पण जेव्हां सर्वच मजुरवर्गाची पैशांतील मजूरी कमी-जास्त होते तव्हां ती गोष्ट विचारांत घ्यावी लागते.[2] ती घेतल्यास पैशांतील मजुरी व कामगारांचें रहाणीमान एकाच दिशेनें जाईल असें निरालस म्हणतां येत नाहीं. हें सर्व लक्षांत घेऊन पैशांतील मजूरीपेक्षां रहाणीमानांतील मजुरीवर लक्ष केंद्रित करणें बरें.

पैशांतील मजूरीपेक्षां वस्तूंतील मजूरी जर महत्त्वाची असेल तर बेकारीच्या दृष्टीनें असा प्रश्न उपस्थित होतो कीं मजूरांचें वस्तूंतील वेतन कमी झाल्यास रोजगारी वाढेल काय ? कोणत्याहि वेळीं वस्तूंतील मजुरीची जी मर्यादा असते त्या मर्यादेपेक्षां कमी वस्तूंतील मजूरी स्वीकारावयास कामगारांची तयारी नसेल आणि केवळ त्यामुळेंच जर बेकारी चालूं रहात असेल तर असें खुशाल म्हणावयास हरकत नाहीं कीं बेकारी कामगारांच्या हट्टीपणामुळेंच चालूं राहिली असून तिला नाखुषीची बेकारी असें कदापि म्हणतां यावयाचें नाहीं. पण बेकारीच्या वेळीं अशी परिस्थिति असते असें म्हणणें कठीण आहे. कारण जेव्हां असंख्य कामगार बेकार असतात तेव्हां हाच अनुभव अधिक येतो कीं मजुरांच्या रहाणीमानांत समाविष्ट होणाऱ्या वस्तूंची किंमत वाढत असूनहि प्रचलित पैशांतील मजुरीवर काम करण्यास बेकार लोक तयार असतात.[3] म्हणजेच वस्तूंतील मजूरींत कपात स्वीकारावयास त्यांची तयारी असते. पण तरीसुद्धां त्यांना आर्थिक व्यवस्थेंत काम मिळूं शकत नाहीं. अशा परिस्थितींत त्यांची बेकारी खुषीची, हट्टीपणाची, किंवा आपणहून ओढवून घेतलेली आहे असें म्हणतां येत नाहीं. ती घर्षणजन्य अर्थातच नसते. कारण घर्षणजन्य बेकारी तिची व्याख्या लक्षांत घेतां सर्व धंद्यांत, सर्व विभागांत एकाच वेळीं असणें शक्य नाहीं. तेव्हां कमी वेतनावर काम करावयाची कामगारांची तयारी असूनसुद्धां त्यांच्यापैकीं बहुसंख्यांना निरुद्योगी रहावें लागलें तर त्यांची बेकारी नाखुषीची, सक्तीची, त्यांच्यावर त्यांचा कांहीं दोष नसतां परिस्थितीनें लादली गेलेली आहे असेंच म्हणावें लागतें.

## नाखुषीच्या बेकारीची कसोटी

वरील विवेचनाचा सारांश असा सांगतां येईल कीं कोणत्याहि वेळची बेकारी घर्षणजन्य आहे, खुषीची आहे कीं नाखुषीची आहे हें ठरविण्याच्या दोन कसोट्या आहेत. त्यांपैकीं पहिली कसोटी म्हणजे बेकारी विशिष्ट उत्पादनक्षेत्रापुरती मर्यादित आहे कीं सर्वव्यापी (general unemployment) आहे ? कोणत्याहि वेळची बेकारी मर्यादित स्वरूपाची असली तर ती घर्षणजन्य असें समजून चालावयास हरकत नाहीं. ती सर्वव्यापी असेल तर तसें समजणें चूक ठरेल. ती सर्वव्यापी असल्यास ती खुषीची आहे कां नाखुषीची आहे हें पाहिलें पाहिजे. कामगार उत्पादनांतील आपला वांटा म्हणजेच वस्तूंतील मजुरी कमी करून घेण्यास तयार नाहींत म्हणूनच केवळ जर ती बेकारी चालूं रहात असेल तर ती खुषीची बेकारी होय. तसें नसेल तर ती नाखुषीची बेकारी ठरते. म्हणजे बेकारीचें स्वरूप ठरविण्याची दुसरी कसोटी ही ठरते कीं कमी वेतनावर काम करावयाची कामगारांची तयारी असल्यास रोजगारी वाढेल किंवा नाहीं ?

वस्तूंतील वेतन कमी होत असतांहि अस्तित्वांत

2. "The assumption that the general level of real wages depends on the money wage bargains between the employers and the workers is not obviously true."
— General Theory — p. 12.

3. "If indeed it were true that the existing real wage is a minimum below which more labour than is now employed will not be forthcoming in any circumstances, involuntary unemployment, apart from frictional unemployment would be non-existent. But to suppose that this is invariably the case would be absurd; for more labour than is at present employed is usually available at the existing money wage, even though the price of wage-goods is rising and consequently the real wages falling." — General Theory -- p. 10.

आलेल्या पैशांतील मजुरीवर काम करावयास कामगारवर्गाची तयारी आहे किंवा नाहीं हें कोणत्याहि काळांतील बेकारी नाखुषीची आहे किंवा नाहीं हें ठरविण्याची मुख्य कसोटी आहे, हें मान्य केल्यास कीन्स ह्यांची नाखुषीच्या बेकारीची व्याख्या समजण्यास अडचण पडत नाहीं. कीन्स ह्यांची व्याख्या पुढीलप्रमाणें आहे : " मजुरांच्या रहाणीमानांत समाविष्ट होणाऱ्या वस्तूंच्या किंमतींत थोडीशी वाढ झाली असतांहि पैशांतील चालू मजुरीवर काम करावयास तयार असलेल्या कामगारांची एकूण संख्या आणि त्याच मजुरीवर जितक्या कामगारांकरितां मागणी आहे ती एकूण संख्या सद्यःस्थितींत रोजगारी मिळालेल्या कामगारांच्या संख्येपेक्षां अधिक असेल तर सद्यःस्थितींत कामगार नाखुषीनें बेकार आहेत असें समजावें."[४] – नाखुषीच्या बेकारीच्या ह्या व्याख्येमध्यें पूर्णोद्योगावस्थेची व्याख्या अर्थातच समाविष्ट आहे. पूर्णोद्योगावस्था असतां मजुरी कमीजास्त होण्याचा कामगारवर्गावर कांहींच परिणाम होत नाहीं. म्हणजेच मजुरींत फरक पडण्यानें रोजगारी वाढत नाहीं. कामगारांच्या पुरवठ्यांतील लवचिकपणा अजिबात नाहींसा होणें म्हणजेच कामगारांचा पुरवठा संपूर्णपणें ताठर (inelastic) होणें ही पूर्णोद्योगावस्थेची प्रमुख खूण म्हणतां येते.[५] मजुरी वाढूनहि अधिक कामगार रोजगारीकरितां पुढें येत नाहींत अशी परिस्थिति झाली म्हणजे किंवा निराळ्या शब्दांत, काम करावयास तयार असलेला एकूण एक कामगार आधींच काम मिळवून बसलेला असला तर पूर्णोद्योगावस्था प्रस्थापित झालेली आहे असें निःसंकोच समजण्यास हरकत नाहीं. मानवी श्रमाकरितां परिणामकारक मागणी वाढली असूनहि पुरवठा अत्यंत 'ताठर' असण्याची परिस्थिति म्हणजेच पूर्णोद्योगावस्था अशी कीन्स ह्यांची व्याख्याच आहे.

नाखुषीची बेकारी आहे किंवा नाहीं ह्याची कीन्स ह्यांची कसोटी पैशांतील मजुरी, वस्तूंतील मजुरी व रोजगारी ह्यांच्यांतील परस्परसंबंधाचा अत्यंत खोलवर विचार करून ठरवलेली कसोटी आहे आणि म्हणूनच शास्त्रीय दृष्ट्या ती अत्यंत कडक कसोटी आहे. पण व्यावहारिक विचार करतां जोन रॉबिन्सन ह्यांनीं सुचवलेली कसोटीहि स्वीकारावयास हरकत नाहीं. श्रीमती रॉबिन्सन ह्यांच्या मतें सद्यःस्थितींत लोकांची जेवढे श्रम करण्याची तयारी आहे तेवढें त्यांना करावयास मिळत नाहींत एवढा पुरावा नाखुषीची बेकारी आर्थिक व्यवस्थेंत आहे हें दर्शविण्यास पुरेसा आहे.[६] नाखुषीच्या बेकारीची ही कसोटी लक्षांत घेतली तर असें म्हणतां येईल कीं सद्यःवेतनावर जेवढें काम करावयास कामगार तयार असतात तेवढें काम आर्थिक व्यवस्था त्यांना पुरवूं शकली तर आर्थिक व्यवस्था पूर्णोद्योगावस्थेप्रत पोंचलेली असते. श्रीमती रॉबिन्सन ह्यांच्याच शब्दांत सांगावयाचें असल्यास असें म्हणतां येईल कीं जेव्हां कोणत्याहि उद्योगपतीला दुसऱ्या कोणातरी उद्योगपतीच्या नोकरवर्गांत कपात झाल्याशिवाय आपला नोकरवर्ग वाढवितां येत नाहीं अशी परिस्थिति उत्पन्न होते तेव्हां आर्थिक व्यवस्थेनें पूर्णोद्योगावस्था गांठलेली असते. त्याहीपेक्षां सोप्या भाषेंत असें म्हणतां येईल कीं जेव्हां न भरलेल्या कामगारांची संख्या जवळजवळ बेकार कामगारांच्या संख्येइतकीच असते तेव्हां पूर्णोद्योगावस्थेची परिस्थिति

4. " Men are involuntary unemployed if, in the event of a small rise in the price of wage goods relatively to the money wage, both the aggregate supply of labour willing to work for the current money wage and the aggregate demand for it at that wage would be greater than the existing volume of employment. " -- General Theory -- p. 15.

5. "An alternative criticism is a situation in which aggregate employment is inelastic in response to an increase in the effective demand for its out-put " — General Theory -- p. 26.

6. " It seems most satisfactory simply to say that the amount of involuntary unemployment is the amount of work which, in existing conditions, the population is willing but unable to perform. " -- Essays in the Theory of Employment, p. 11.








असते. ह्या परिस्थितींतील बेकारी प्रामुख्यानें घर्षणजन्य अशी असते; म्हणजेच रिकाम्या जागांची माहिती होऊन त्यावर रुजूं होण्यास कामगारांना साहजिकच जो वेळ लागतो त्यामुळें उद्भवलेली असते. थोडक्यांत पूर्णोद्योगावस्थेंतील बेकार लोक एका नोकरींतून दुसऱ्या नोकरीकडे जाणारे वाटसरू असतात.

## पूर्णोद्योग, अल्पोद्योग, अतिपूर्णोद्योग

नाखुषीच्या बेकारीचा पूर्णपणें अभाव असलेल्या परिस्थितीला पूर्णोद्योगावस्था म्हटलें तर नाखुषीची बेकारी असलेल्या परिस्थितीला अल्पोद्योगावस्था म्हणतां येईल. ह्या दोन कल्पनांच्या अनुषंगानें आणखी एक कल्पना अर्थशास्त्रांत आली आहे. ती म्हणजे अतिपूर्णोद्योगावस्था. अल्पोद्योगावस्थेंत रिकाम्या जागांची संख्या बेकारांच्या संख्येपेक्षां पुष्कळ अधिक असते तर पूर्णोद्योगावस्थेंत वर सांगितल्याप्रमाणें बेकारांची संख्या व जागांची संख्या सारखीच असते. अतिपूर्णोद्योगावस्था ही पूर्णोद्योगावस्थेपलीकडील अवस्था होय. त्या अवस्थेंत रिकाम्या जागांची संख्या काम मिळवूं पहाणाऱ्या कामगारांपेक्षां पुष्कळच अधिक असते.[७] अल्पोद्योगावस्था, पूर्णोद्योगावस्था व अतिपूर्णोद्योगावस्था ह्यांच्यामधील फरक असा सांगतां येईल कीं अल्पोद्योगावस्थेंत कामगारांची चणचण मुळींच भासत नाहीं. पूर्णोद्योगावस्थेंत ती भासते असा भास झाला तरी खरीखुरी भासत नाहीं आणि अतिपूर्णोद्योगावस्थेंत ती तीव्रतेनें जाणवते. मजुरीच्या बाजूकडून विचार करून त्या तीन अवस्थांतील फरक असाहि सांगतां येईल कीं मागणीपेक्षां पुरवठा जास्त असल्यानें अल्पोद्योगावस्थेंत मजुरी कमी होऊं पाहते, पूर्णोद्योगावस्थेंत मजुरी आहे त्याच ठिकाणीं स्थिर होऊं पहाते आणि अतिपूर्णोद्योगावस्थेंत मजुरी वाढूं पहाते.

वर सांगितलेल्या अल्पोद्योगावस्था, पूर्णोद्योगावस्था व अतिपूर्णोद्योगावस्था ह्या भांडवलशाहीच्या नव्या अर्थशास्त्रांतील प्रमुख अशा कल्पना आहेत. ह्या तीन कल्पनांच्या आधारें हें नवें अर्थशास्त्र असें सांगतें कीं पूर्णोद्योगावस्था गांठणें व ती अवस्था टिकवून धरणें हें आर्थिक व्यवस्थेचें उद्दिष्ट असलें पाहिजे. अल्पोद्योगावस्था म्हणजे ज्या अवस्थेंत नाखुषीची बेकारी फार मोठ्या प्रमाणांत असते अशी अवस्था वाईट. कारण त्या अवस्थेंत बेकारींतून व बेकारीच्या भयांतून उद्भवलेली आर्थिक असुरक्षितता बहुसंख्य लोकांच्या वांट्याला येते आणि उत्पादनाच्या साधनांचा भरपूर उपयोग करून घेण्याच्या बाबतींतलें अपयश आर्थिक व्यवस्थेच्या पदरीं येतें. त्याशिवाय बहुसंख्य लोकांच्या नाराजीमुळें आर्थिक व्यवस्थेच्या स्थैर्यालाच धोका पोहोंचतो तें निराळेंच. अल्पोद्योगावस्था जशी वाईट तशी अतिपूर्णोद्योगावस्थाहि वाईट. कारण तिच्यांत बेकारीचा संपूर्णपणें अभाव असला तरी दुसरे दोष असतात. कामगार कसे मिळवावेत ह्याची उद्योगपतींना पडणारी चिंता, उत्पादित वस्तूंची टंचाई, उत्पादित वस्तूंची वांटणी बरोबर व्हावी म्हणून जरूर असलेली सर्व प्रकारचीं सरकारी नियंत्रणें, सर्वत्र लांब रांगा ही अतिपूर्णोद्योगावस्थेचीं वैशिष्ट्यें होत. युद्धकाळांत ह्या गोष्टींना सरावलेला मनुष्यहि ह्या गोष्टी चांगल्या असें म्हणणार नाहीं. पूर्णोद्योगावस्था सर्व दृष्टीनें हितावह आहे. कारण तिच्यांत सर्वच बाबतींत मागणी व पुरवठा ह्यांचा समन्वय साधलेला असतो. आणि त्यामुळें आर्थिक व्यवस्थेला एक विशेष प्रकारचें स्थैर्य येतें.

पूर्णोद्योगावस्थेच्या कसोटीनें भांडवलशाहीच्या नव्या अर्थशास्त्राचे दोन प्रमुख भाग पडतात. पहिल्या भागांत पूर्णोद्योगावस्थेप्रत आर्थिक व्यवस्था पोंचते किंवा नाहीं, पोंचल्यास ती तेथें टिकून राहण्याचा संभव कितपत असतो ह्या प्रश्नाचा विचार होतो. दुसऱ्या भागांत पूर्णोद्योगावस्था गांठण्यासाठीं व टिकून धरण्यासाठीं कोणत्या धोरणाची गरज असते ह्याचा विचार होतो. ह्या दोन्ही प्रश्नांच्या बाबतींत कीन्सपूर्वं भांडवलशाही अर्थशास्त्र अपुरें पडलें, म्हणून नव्या अर्थशास्त्राची जरूरी उत्पन्न झाली असा नव्या अर्थशास्त्राच्या पुरस्कर्त्यांचा दावा आहे हें येथें मुद्दाम सांगितलें पाहिजे. पूर्णोद्योगावस्थेप्रत भांडवलशाही आर्थिक व्यवस्था पोहोचण्याच्या व तेथें ती टिकून राहण्याच्या प्रश्नाच्या बाबतींत जुनें अर्थशास्त्र अपुरें पडलें कारण " अमर्यादित गरजांमुळें जेवढें उत्पादन होईल तेवढें थोडेंच अशी स्थिति असते; त्यामुळें पुर-

७. 'There is a much greater number of vacancies than people looking for jobs.'
– Ohlin –– The Problem of Employment Stabilisation p. 6.










बरोबरीनें मागणी अशी परिस्थिति निर्माण होऊन उत्पादनसाधनांना काम कमी असें कधींहि होण्याचा संभव नसतो; अर्थात् बेकारीचा प्रश्नच उद्भवत नाहीं—" अशा आशयाचा से ह्या अर्थशास्त्रज्ञानें सांगितलेला सिद्धान्त त्या अर्थशास्त्रानें विशेष चिकित्सा न करतां गृहीत धरला होता. तो सिद्धान्त गृहीत धरल्यामुळें साहजिकच भांडवलशाहींत नाखुषीच्या बेकारीला स्थानच नाहीं असा निष्कर्ष साहजिकच त्या अर्थशास्त्रानें काढला. से ह्यानें जेव्हां आपला सिद्धान्त प्रतिपादिला तेव्हां भांडवलशाही आर्थिक व्यवस्थेला बेकारीचा प्रश्न फारसा भेडसावीत नव्हता ही गोष्ट कबूल केली पाहिजे. त्यामुळेंच मुख्यतः बेकारीच्या शक्यतेकडे त्याचें दुर्लक्ष झालें हेंहि मान्य करण्यास हरकत नाहीं. विसाव्या शतकांतील जुन्या पठडींतील अर्थशास्त्रज्ञांचें बेकारीकडे लक्ष गेलें पण सेचा सिद्धांत त्यांनीं आधींच ग्राह्य धरलेला असल्यामुळें बेकारीची विशेष चिकित्सा करण्यापेक्षां भांडवलशाहींतील बेकारी हा त्या आर्थिक व्यवस्थेंतील अंगभूत दोष नसून त्या आर्थिक व्यवस्थेच्या कार्यांत अडथळे आणण्याचा तो परिणाम आहे असें त्यांनीं प्रतिपादलें. ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें नव्या अर्थशास्त्राला वाटत असल्यामुळें बेकारीच्या नव्या अर्थशास्त्राच्या चिकित्सेला विशेष महत्त्व आलें आहे. भांडवलशाहींत नाखुषीची बेकारी आर्थिक व्यवस्थेच्या कार्यपद्धतीमुळें उद्भवतच नाहीं आणि जेव्हां मोठ्या प्रमाणावर बेकारी असते तेव्हां ती कामगारवर्गाच्या विशिष्ट वेतनाकरितां आग्रह धरण्याच्या व त्या आग्रहाला हट्टीपणानें चिकटून रहाण्याच्या वृत्तींतून उद्भवलेली असते असें भांडवलशाहीच्या जुन्या अर्थशास्त्राला वाटत असल्यामुळें त्याकरितां विशेष उपाययोजना करावी लागते असें त्यांना वाटत नसल्यास नवल नाहीं. शिवाय " आर्थिक व्यवस्थेंत अदृश्य हाताच्या प्रभावामुळें आपोआप सर्व कांहीं टाकठीक होते " ह्या स्मिथच्या वचनावर भांडवलशाहीच्या जुन्या अर्थशास्त्राचा इतका विश्वास होता ( — स्मिथनंतर हा विश्वास कमी कमी होत गेला पण पुरा नाहींसा मात्र झाला नाहीं — ) कीं सरकारचें धोरण अनियंत्रणवादाच्या तत्त्वावर आधारलेलें असावें असें त्या अर्थशास्त्राला मनापासून वाटत होतें. त्यामुळें अर्थातच त्या अर्थशास्त्राकडून बेकारीनिवारणासाठीं गंभीर स्वरूपाची योजना पुरस्कारिली जाण्याचा प्रश्नच नव्हता. अशा प्रकारें बेकारीच्या मीमांसेच्या दृष्टीनें व ती निवारण्याची उपाययोजना स्वीकारण्याच्या दृष्टीनें विचार केल्यास जुन्या अर्थशास्त्राचा तोकडेपणा नजरेंत भरतो. हा तोकडेपणा दूर होण्यासाठीं भांडवलशाही अर्थशास्त्राचें स्वरूप बदलण्याची जरूरी पडली. नव्या अर्थशास्त्रानें हेंच कार्य केलें.

---

## जुनें वर्ष – आणि नवें वर्ष

जग कडक हिमानें होतें गारठलेलें
घनदाट तमानें अन् तें माखुनि गेलें
त्या भयाण रातीं रातकिडे किरकिरती
घूत्कार करी तें घुबडहि चिंचेवरलें

तों फिकट पांढरें दाट धुकें अवतरलें
कीं धरतीवरतीं प्रेत-वसन आंथरलें
कीं प्रलयकालचा धूम दिसे कोंदटला
तें सकल चराचर गुदमरुनीया गेलें

त्या जीर्ण जगाच्या उजाड माळावरतीं
तो कोण प्रवासी रखडत आला अन्तीं ?
ती पहा लागली शेवटची त्या घर्घर
अन् फुटला बुद्बुद कालसागरावरतीं

जें शुभाशुभाचें बासन जवळीं गळलें
तें पाहुनि भोळे निराश होउनि गेले
अन् शापुनि देती अगणित दूषण त्यातें !
तों अवचित नूतन आशास्थानचि दिसलें

तें काय दिसें त्या पूर्वक्षितिजावरतीं ?
ती बाल हांसरी कोमल सोज्वल मूर्ति
ते आतुरले जन, कातर अन्तर झालें
तें नवीन बासन उघडुनि बघण्या हातीं !

— विश्वनाथ के. महाबळेश्वरकर








प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# भारतांतील बेकारीचा प्रश्न

डिसेंबर १९५३ च्या अखेरीस जयपूर येथें अर्थशास्त्रपरिषद् भरली होती. 'भारतांतील बेकारीचा प्रश्न' हा एक विषय या परिषदेपुढें चर्चेसाठीं होता. परिषदेनें आपले असे निष्कर्ष काढले नाहींत किंवा निश्चित असें मार्गदर्शनहि पण केलें नाहीं. परंतु विषयाच्या विविध बाजू लक्षांत येण्याच्या दृष्टीनेंहि अशा चर्चेचा उपयोग होऊं शकतो. या विषयासंबंधीं परिषदेपुढें मांडण्यांत आलेल्या विचारांचें स्वरूप थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल :

( १ ) शहरांतील बेकारी, ग्रामीण विभागांतील बेकारी, सुशिक्षितांतील व अशिक्षितांतील बेकारी याविषयींची निश्चित आंकडेवारी उपलब्ध नाहीं. भारतांत आर्थिक प्रश्नाचा विचार करतांना नेहमींच पदोपदीं जाणवणारी ही अडचण आहे.

( २ ) भारतासारख्या देशांत बेकारीचीं तीन प्रमुख कारणें म्हणून सांगता येतील : ( अ ) आर्थिक मंदीमुळें येणारी बेकारी. ही प्रगत व अप्रगत भांडवलशाही राष्ट्रांना कालक्रमानें वरचेवर जाणवत असते. या बेकारीवर करावयाच्या उपाययोजनांचे बरेचसे आडाखे केन्सप्रणीत अर्थशास्त्रानें आतां बसविलेले आहेत. ( ब ) लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणांत उत्पादनांत वाढ न होऊं शकल्यामुळें जादा लोकसंख्येला पुरेसें काम उपलब्ध न झाल्यानें निर्माण होणारी बेकारी. लोकसंख्येंत अखंड वाढ होत असणाऱ्या अप्रगत राष्ट्रांत या प्रकारची बेकारी निर्माण होते. (क) उद्योगधंद्यांच्या यांत्रिकीकरणामुळें हस्तव्यवसायांचा लोप होऊन निर्माण होणारी बेकारी. या प्रकारची बेकारी प्रगत राष्ट्रांतून आयात होणाऱ्या मालाच्या चढाओढीमुळें निर्माण होऊं शकेल. या परिस्थितींत हस्तव्यवसायांचा व घरगुती उद्योगधंद्यांचा लोप होईल व देशांत मोठ्या उद्योगधंद्यांचा विकासहि पण होणार नाहीं. ब्रिटिश अधिराज्याखालीं आपली बहुतांशीं हीच परिस्थिति होती. राष्ट्रीय मोठ्या उद्योगधंद्यांच्या विकासामुळेंहि घरगुती उद्योगधंदे मारले जातात व बेकारी निर्माण होते. परंतु मोठ्या उद्योगधंद्यांचा विकास तरी राष्ट्राच्या पदरीं पडत असतो. शिवाय लहान उद्योगधंद्यांच्या नाशामुळें बेकार झालेल्या सर्वच लोकांना नसलें तरी त्यापैकीं कांहींना तरी या मोठ्या उद्योगधंद्यांत काम मिळणें शक्य असतें. आपल्या औद्योगिक विकासाच्या काळांत भारताला अशा प्रकारच्या बेकारीकडे विशेष लक्ष पुरवावें लागेल.

( ३ ) सरकार दक्ष राहिल्यास आर्थिक मंदीमुळें येणाऱ्या बेकारीची तीव्रता कमी करतां येण्यासारखी असते. अप्रगत राष्ट्रांत याहि बाबतींत अडचणी संभवतात. आजच्या बेकारींत आर्थिक मंदीमुळें आढळून येणाऱ्या बेकारीचें प्रमाण किती याविषयींची निश्चित कल्पना येऊं शकत नाहीं.

( ४ ) सुशिक्षितांतहि आज बेकारी आढळून येते. तन्त्रज्ञांना, विशेषज्ञांना काम मिळण्यास कितपत वाव आहे यावरुनहि अर्थव्यवस्था प्रगतिपर आहे कीं नाहीं हें अजमावतां येतें. सुशिक्षितांतील बेकारीचा अर्थ एक तर शिक्षणपद्धति सदोष आहे, असा होऊं शकेल किंवा आर्थिक नियोजन परिणामकारक पद्धतीनें पार पाडलें जात नाहीं असाहि होऊं शकेल. आजच्या परिस्थितींत दोषाचा वांटा दोघांच्याकडेहि जातो. या बाबतींत आजच सरकारला दोष लावणें युक्त होणार नाहीं; कारण आजवर सरकारला मिळालेला अवधीहि तसा थोडाच होता. तथापि भविष्यकाळाविषयीं आशा बाळगावी असेंहि सरकारचें याविषयींचें धोरण आढळत नाहीं, अशी टीका कोणाला करतां येईल.

( ५ ) एखाद्या नैसर्गिक आपत्तीपुढें हताश होऊन नमावें त्याप्रमाणें लोकसंख्येच्या बेसुमार वाढीकडे एक गृहीतकृत्य म्हणून पाहण्यापलीकडे दुसरें कांहीं करणें निदान पुढील एका पिढीच्या काळांत तरी शक्य होणार नाहीं. लोकसंख्येच्या वाढीमुळें निर्माण होणाऱ्या बेकारीवर यामुळेंच तातडतोबीचा असा उपाय

सुचविणें अशक्य आहे.

(६) मोठ्या उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें लहान उद्योगधंद्यांचा नाश होऊन निर्माण होणाऱ्या बेकारीला यापुढें भारताला सततच तोंड द्यावें लागणार आहे. औद्योगीकरणाचा तो एक अटळ परिणाम आहे. इतर राष्ट्रांच्या औद्योगीकरणाचा इतिहास हेंच सांगतो. या बेकारीपासून होणारे दुष्परिणाम कमी करण्यासाठीं औद्योगीकरणाची गति किती असावी, कोणत्या क्षेत्रांत यांत्रिकीकरण प्रथम अंमलांत आणावें, विविध उत्पादन-क्षेत्रांत यांत्रिकीकरणाची मर्यादा कोणती असावी, बेकार झालेल्या लोकांना कोणत्या प्रकारें व किती मदत द्यावी, याविषयीं कसोशीनें विचार होणें आवश्यक आहे. हा केवळ तात्त्विक विवेचनाचा भाग नसून व्यावहारिक निर्णयात्मक मार्गदर्शनाचा आहे. यासाठीं आवश्यक असणारा तपशीलवार अभ्यास अद्याप आपल्याकडे झालेला नाहीं. एखाद्या उद्योगधंद्याचें यांत्रिकीकरण करण्याचा प्रयत्न करीत असतां त्याच क्षेत्रांत लहान उद्योगधंद्यांना सरकारी मदत देण्याचा प्रयत्न करणें हें चुकीचें ठरेल, एवढेंच सर्वसाधारण विधान आपल्याला तात्त्विक विवेचनाच्या आधारानें फार तर करतां येईल.

भारतांतील बेकारीच्या प्रश्नाचे तात्कालिक व चिरकालिक असे दोन विभाग आपल्याला करतां येतील. लोकसंख्येची वाढ व मोठ्या उद्योगधंद्यांमुळें लहान उद्योगधंद्यांचा नाश हीं आजवर चिरकाल चालत आलेलीं कारणें म्हणून सांगतां येतील. गेल्या वर्षभरांत एकदम जाणवूं लागलेल्या ह्या प्रश्नाची संपूर्ण मीमांसा केवळ या कारणांच्या आधारानें करतां येत नाहीं. युद्धकाळांत उत्पादनवाढीच्या आवश्यकतेमुळें लहान उद्योधंद्यांनाहि उत्तेजन मिळालेलें होतें. ती स्थिति आज राहिली नाहीं व लहान उद्योगधंदे अडचणींत येऊं लागले आहेत हे बेकारीचें एक कारण आहे. आर्थिक मंदीशीं सदृश असणारी इतरहि कारणें आहेत. सरकारला प्रश्नाचा विचार करतांना तात्कालिक बाजूकडेहि विशेष लक्ष पुरविणें आवश्यक असते. या दृष्टीनें या बाजूचा पुरेसा विचार परिषदेनें केला नाहीं असेंच म्हणणें भाग आहे.

चिरकालिक कारणांचेंहि पुरेसें विवेचन झालें नाहीं. अप्रगत राष्ट्रांच्या विकासक्रमांत अटळपणें पुढें उभा राहणारा हा एक महत्वाचा प्रश्न आहे. आजवरच्या इतर राष्ट्रांच्या आर्थिक विकासाच्या इतिहासाचें मार्गदर्शन यासाठीं पुरेसें नाहीं. साम्राज्यशाहीपासून होणारे आर्थिक शोषणाचे फायदे त्या राष्ट्रांना उपलब्ध होण्यासारखे होते. आजच्या अप्रगत राष्ट्रांनीं आपलें स्वातंत्र्य राखलें म्हणजे पुरें. साम्राज्याची भलती आकांक्षा त्यांनीं बाळगूं नये. साम्राज्याच्या आधारावरच तग धरूं शकणारी अर्थव्यवस्था या राष्ट्रांना पेलूं शकेल काय ? याखेरीज आपल्या आर्थिक विकासाच्या काळांत आजच्या प्रगत राष्ट्रांनीं जीं आनुषंगिक दुःखें भोगलीं तीं भोगावयास आजची अप्रगत राष्ट्रांतील जनता तयार आहे काय ? आजचा दलितवर्ग हा अधिक जागरूक व राजकीय दृष्ट्या संघटित आहे. एकोणिसाव्या शतकांत आर्थिक विकासाचा परिणाम म्हणून बेकार लोकांनीं जीं दुःखें निमूटपणें सहन केलीं तींच आज क्रान्तीचा प्रक्षोभ उठविल्याखेरीज राहणार नाहींत. अशा स्थितींतहि आर्थिक प्रगति कशी करतां येते याचें उदाहरण रशियानें दाखविलें आहे; परंतु तेथेंहि जनतेला हुकूमशाही-मार्गानेंच ताब्यांत ठेवणें भाग पडलें. एकोणिसाव्या शतकांत भांडवलशाहीला आर्थिक विकासासाठीं द्याव्या लागणाऱ्या मूल्याचा विचार करावा लागला नाहीं. कारण तशी विचारणा करणारी दलितांची संघटित शक्ति नव्हती. विसाव्या शतकांत रशियालाहि या मूल्याचा विचार करावा लागला नाहीं कारण असा प्रश्न विचारण्याचें धैर्य करणाऱ्यांचा अडथळा दूर करण्याचे हुकूमशाही मार्ग रशियापाशीं होते. लोकशाही व शीघ्र आर्थिक विकास हें दुहेरी ध्येय साध्य करूं पाहणाऱ्यांच्या मार्गांत मात्र विलक्षण पेंचप्रसंग उभा आहे. अप्रगत राष्ट्रांतील बेकारीचा प्रश्न हें त्याच पेंचप्रसंगाचें एक स्वरूप आहे. या पेंचप्रसंगाची सोडवणूक आचारांत प्रत्यक्ष कशी होईल ती होवो; पण अजून तरी विचारांतहि ती नीटशी झाल्याचें आढळून येत नाहीं. याविषयीं अधिक विचार करणें हें अप्रगत राष्ट्रांतील अर्थशास्त्राच्या अभ्यासकांचें एक निकडीचें कर्तव्य आहे.

प्रा. वि. वा. कोगेकर

# नव्या अस्त्राची चाहूल

कांहीं महिन्यांपूर्वी रशियन पंतप्रधान मॅस्सूर जॉर्जी मालेन्कॉव्ह यांनीं सुप्रीम सोव्हीएटच्या अधिवेशन-प्रसंगीं रशियानें हैड्रोजन-बांब तयार केल्याची एक घोषणा केली. त्या घोषणेला अमेरिकन परमाणु-ऊर्जा-समिती-( ॲटॉमिक एनर्जी कमिशन )नें दुजोरा-हि दिला. याच वेळीं मॉलेन्कॉव्ह यांनीं जाहीर केलें कीं रशियाजवळ परमाणु-अस्त्रापेक्षां शक्तिशाली अशा तऱ्हेचा उद्जनस्फोटक ( हैड्रोजन बॉम्ब ) आहे. अमेरिकन ऊर्जासमितीच्या अध्यक्षांनीं या बातमीला दुजोरा देतांना सांगितलें कीं, ता. १२ ऑगस्ट रोजीं सोव्हिअेट रशियांत अशा तऱ्हेच्या उद्जनस्फोटकाचा स्फोट झाला याची नोंद अमेरिकेंतील अत्यंत सूक्ष्म अशा, स्फोटानंतर वातावरणांत सर्वत्र पसरणाऱ्या तेजोद्गर ( रेडिओॲक्टिव्ह ) परमाणूंनां बरोबर हुडकणाऱ्या यंत्राच्या सहाय्यानें करण्यांत आली. याचा अर्थ इतकाच कीं, नवीं नवीं प्रचंड संहारक अस्त्रें निर्माण करण्याच्या चढाओढींत रशिया-हि अमेरिकेच्या जोडीला आला आहे. त्यामुळें जर संघर्षाचा प्रसंग उद्भवला तर या नव्या अस्त्रांचा सर्रास वापर होण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

परमाणुस्फोटक व उद्जनस्फोटक यांच्या विषयीं सामान्य वाचकाला 'महाभयंकर कांहींतरी' यापेक्षां फारशी माहिती असण्याचा संभव कमी, म्हणून त्या-विषयींची कांहीं सामान्य शास्त्रीय माहिती देणें योग्य ठरेल.

गेल्या शतकांत तेजोद्गर पदार्थांच्या गुणधर्मांचें संशोधन झाल्यापासून परमाणूच्या अंतर्रचनेबद्दलची माहिती फार झपाट्यानें संशोधिली जाऊं लागली व गेल्या अर्धशतकांत तर ती जवळ जवळ पूर्णते-प्रत पोंचण्याच्या मार्गाला लागली आहे.

सामान्यतः प्रत्येक परमाणु हा सूर्यमालेप्रमाणें रचलेला असतो असें आढळलें. सूर्यमालेंत सूर्याचें जें स्थान तें परमाणूंत न्यष्टी( न्यूक्लीअस )चें स्थान व सूर्याभोंवतीं भ्रमणाऱ्या ग्रहांचें जें स्थान तें परमाणूंत विद्युदणूंचें ( इलेक्ट्रानस्‌चें ) स्थान. परमाणु-न्यष्टि सामान्यतः घनविद्युत्प्रभारित (charged) अशा प्राणूं-( प्रोटॉन्स )ची व विद्युत्प्रभाररहित क्लीबाणूं-(न्यूट्रान्स)-ची बनलेली असते. न्यष्टि व तिच्यासभोंवती फिरणारे विद्युदणू यांच्यांतील अंतराविषयींची स्पष्ट कल्पना खालील उदाहरणावरून येण्यासारखी आहे.

सुमारें १०० एकर जमिनीच्या तुकड्याच्या मध्यभागीं जर एक पाव हात व्यासाचा चेंडू ठेवला, तर ती झाली न्यष्टि किंवा न्यूक्लिअस. त्या जमीनीच्या तुकड्याच्या परिघावरून जर एखादी माशी फिरेल तर तो झाला विद्युदणु. प्रत्येक परमाणूच्या न्यष्टीमध्यें जितके प्राणू असतात तितकेच विद्युदणू त्या परमाणूच्या परिघावर वेगवेगळ्या कक्षांतून फिरत असतात. त्यामुळें प्रत्यक्ष परमाणु प्रभार-( चार्ज )रहित आढळतो. विद्युदणूचा भार ( 'मास्' ) प्राणूच्या $\frac{१}{१८५०}$ इतका असतो. त्यामुळें परमाणूंचा भार म्हणजे जवळजवळ त्यांच्या न्यष्टींचा भारच. प्राणू व क्लीबाणू यांचा भार बराच असतो. त्यामुळें परमाणूंचा मुख्य घन भाग म्हणजे त्याची न्यष्टि. जड जड वजनाचे जे पदार्थ असतात, त्यांच्या न्यष्टींत खूपच प्राणू व क्लीबाणू असनात. सामान्य उद्जन ( हैड्रोजन ) वायु हा सर्वांत हलका आहे. त्याच्या परमाणुन्यष्टींत फक्त एकच प्राणु असतो. कोळशाच्या परमाणुन्यष्टींत सहा प्राणू व सहा क्लीबाणू असातात, तर लोखंडाच्या परमाणु-न्यष्टींत सव्वीस प्राणू व तीस क्लीबाणू असतात. चांदीच्या परमाणुन्यष्टींत सत्तेचाळीस प्राणू व साठ क्लीबाणू असतात, तर शिशाच्या परमाणुन्यष्टींत ब्यायशी प्राणू व एकशेंसव्वीस क्लीबाणू असतात. तेजातू-( रेडिअम )च्या न्यष्टींत अठ्ठ्यायशी प्राणू व एकशेंअडतीस क्लीबाणू असतात, तर किरणातू-( युरे-नियम )च्या न्यष्टींत ब्याणव प्राणू व अेकशे-








सेहेचाळीस क्लीबाणू असतात.

अशा रीतीनें जास्ती भार असणाऱ्या परमाणूंच्या न्यष्टींतील प्राणूंची संख्या वाढत जाण्यामुळें त्यांच्या न्यष्टींची स्थिरता कमी होते. सामान्यतः सम विद्युत्-प्रभार असणाऱ्या दोन वस्तू एकमेकींला दूर लोटतात. त्यामुळें समप्रभार असणारे हे प्राणू न्यष्टीच्या स्वल्प जागेंत एकत्रित ठेवण्यासाठीं खूपच ( शक्ति ) ऊर्जा ( एनर्जी ) खर्ची पडत असली पाहिजे. प्रत्यक्षांत तेजोद्गर ( रेडिओॲक्टिव्ह ) असणारे तेजातु ( रेडिअम ), किरणातु ( युरेनियम ) यांसारखे धातु अस्थिर असलेले आढळतात याचें कारण इतक्या प्राणूंना एकत्रित ठेवणें त्यांना शक्य होत नाहीं. त्यामुळें त्यांच्या न्यष्टींतून प्राणू, क्लीबाणू सारखे बाहेर पडतात; त्याबरोबरच त्यांना एकत्रित ठेवण्यासाठीं खर्ची पडलेली ऊर्जा बाहेर पडते.

यावरून हें दिसून येईल कीं, कृत्रिम रीतीनें जर एखाद्या परमाणूची न्यष्टि ( न्यूक्लिअस ) अस्थिर केली तर तो परमाणु ऊर्जा बाहेर टाकूं शकेल. याच तत्त्वाचा उपयोग करून परमाणुगोलकाची रचना करण्यांत आली. किरणातू-( रेडिअम )चे जे सस्थानी ( आयसोटोपस् ) आहेत, त्यापैकीं २३५ भाराचा सस्थानी निवडण्यांत आला. कारण तो लवकर अस्थिर करतां येतो व अस्थिर होतांच क्लीबाणू बाहेर फेकूं लागतो. त्यामुळें बाहेरून एक क्लीबाणु किरणातु २३५ च्या न्यष्टीवर बरोबर पोंचूं शकला तर ती न्यष्टि अस्थिर होते व क्लीबाणू फेकूं लागते. हा फेकलेला क्लीबाणु दुसऱ्या किरणातु २३५ च्या न्यष्टीवर जातो व पुन्हां तीच क्रिया करतो. अशा रीतीनें एक शृंखलाप्रक्रिया ( चेन-रिॲक्शन ) सुरू होते व प्रचंड प्रमाणावर ऊर्जा बाहेर पडते. सर्व प्रक्रिया इतक्या झपाट्यानें होते कीं खूपशी ऊर्जा कांहीं पळांच्या अवकाशांतच प्रचंड वेगानें बाहेर उफाळते. एक पौंड किरणातु २३५ चा स्फोटासाठीं उपयोग केला, तर ११०४ दशलक्ष सहस्र किलोवॅट अवर इतकी ऊर्जा (एनर्जी) बाहेर पडते. म्हणजे सुमारें १५०० टन कोळसा जाळून वा १६००००० शेर पेट्रोल जाळून मिळणाऱ्या उष्णतेइतकी ती ऊर्जा असते. इतकी ऊर्जा व सोबत तेजोद्गर (रेडिओॲक्टिव्ह) पदार्थांचे अणू बाहेर पडल्यामुळें परमाणुगोलकांच्या स्फोटानंतर उडणाऱ्या हाहाकाराची सहजच कल्पना करतां येईल.

हिरोशिमावर टाकण्यांत आलेल्या परमाणुगोलकांत सुमारें दोन पौंड स्फोटक सामान होतें. प्रत्यक्ष झालेला स्फोट २०,००० टन टी. एन्. टी. पासून होणाऱ्या स्फोटाइतका प्रचंड होता. तो महाप्रचंड स्फोट होण्यास फक्त एकदशलक्षांश पळाचा अवधि लागला. ( एखाद्या जोरदार बंदुकीची गोळी इतक्या वेळांत अक्षरशः रेस-भरच पुढें जाऊं शकेल. ) या अतिस्वल्प अवधींत एक हातभर पुढें सरकणें म्हणजे सुमारें प्रत्येक पळाला कांहीं हजार मैलांचा वेग पडतो. त्यामुळें निर्माण होणारा हवेचा दाब एक पैशाएवढ्या जागेवर सुमारें दशलक्ष टन इतका होतो. या प्रचंड दाबानें मोठमोठीं शहरें त्यांतील प्रचंड इमारतींसह भुईसपाट होऊन जाऊं शकतात. स्फोटाबरोबर भयंकर उष्णतेचा ( सुमारें १०००° ) लोळ तयार होतो व नाना तऱ्हेचीं अपायकारक तेजोद्गर विकिरणें ( रेडिएशनस् ) बाहेर पडून हवेंत मिसळतात. यावरून परमाणुस्फोटकाच्या संहारक शक्तीची कल्पना करतां येईल.

नवसंशोधित उदजनस्फोटक ( हैड्रोजन बॉंब ) किंवा सवाई परमाणुस्फोटक याच्या रचनेमागील शास्त्रीय बैठक मात्र खूपच वेगळी आहे. परमाणु अस्थिर करून ऊर्जा निर्मिणें ही परमाणुगोलकाची शास्त्रीय बैठक, तर छोटे परमाणू एकत्रित करून नवे स्थिर परमाणू निर्माण करून ऊर्जा मिळविणें ही या नव्या गोलकाची शास्त्रीय बैठक.

वस्तूंचें उष्णतामान जसजसें वाढत जातें तसतसा त्यांच्या परमाणूंच्या भ्रमणाचा वेग खूपच वाढत जातो. पाण्याचें उष्णतामान वाढतांच वाफ तयार होते व पाण्याचे अणू एका भांड्यांत न राहतां वेगानें बाहेर पडूं लागतात हें नेहमीचें दृश्य आहे.

अशा रीतीनें जर उष्णतामान खूपच वाढविलें तर सम विद्युत्प्रभारित अशा प्राणूंची गति इतकी वाढूं शकते कीं, त्यांच्या एकमेकाला दूर लोटण्याच्या शक्तीवरहि ती मात करते. सूर्याच्या गर्भांत अशा तऱ्हेनें खूप उष्णतेमुळें प्राणूंची गति वाढलेली असावी असें मानतात. सूर्याचें उष्णतामान २ कोटी अंश इतकें आहे. या अवस्थेंत प्राणूंचें एकीकरण सुलभतेनें होतें.

ज्याप्रमाणें खूप प्राणू एकत्रित आल्यामुळें किरणातु ( युरेनिअम) हा अस्थिर असतो, त्याचप्रमाणें फारच कमी







प्राणू असलेले परमाणूहि अस्थिर असतात. उदजना-(हैड्रोजन)च्या न्यष्टींत फक्त एकच प्राणु असतो. त्यामुळें अधिक प्राणू मिळवून स्थिर अशी हेलियमची रचना प्राप्त करून घेण्याकडे त्याची ओढ असते. वर वर्णिलेल्या अति उष्णतेच्या परिस्थितींत प्राणूंचें संयुक्तीकरण होऊन हेलियम तयार होणें शक्य असतें. सूर्याच्या गर्भांत त्यामुळेंच हेलियम वायु असावा असें मानतात.

या संयुक्तीकरणांतहि प्रचंड ऊर्जा बाहेर पडते. प्रत्येक प्राणूचें भारमान १·००८ इतकें असतें. चार प्राणू एकत्र आल्यावर एक हेलियमचा परमाणु तयार होतो. त्याचा भार ४·००३ इतका असतो. म्हणजे या संयुक्तीकरणांत ४×(१·००८)−४·००३ = ०·०२९ इतका पुंजभार (Mass) नाहींसा होतो. त्याचें ऊर्जे-(एनर्जी)मध्यें रूपांतर होतें. हीच ऊर्जा आपणाला सूर्यापासून उष्णतेच्या रूपानें मिळते. एक पाडभर पुंजभाराचें, सापेक्षतावादाच्या तत्त्वाप्रमाणें ४·५×१० इतक्या एनर्जी युनिटस्मध्यें रूपांतर होऊं शकतें. ही ऊर्जा (एनर्जी) खरोखर फारच प्रचंड आहे.

उदजन-स्फोटकाच्या प्रत्यक्ष निर्मितीसाठीं उदजनाचा अक (सामान्य उदजनाच्या दुप्पट वजनाचा) सस्थानी (आयसोटोप) वापरावा लागेल. अतिशय प्रखर असें उष्णतामान निर्माण करण्यासाठीं एखाद्या परमाणु-स्फोटकाचा स्फोटहि करावा लागेल. परमाणु-स्फोटकाकरितां लागणारा किरणातु (युरेनिअम) २३५ हा पदार्थ फारच महाग, कष्टदायक व शिवाय अल्प प्रमाणांत मिळणारा. शिवाय अितर कांहीं वज्ञानिक कारणामुळें परिणामकारक स्फोटक तयार करावयाचा तर त्याचा आकारहि विशिष्ट मर्यादेचा असला पाहिजे. पण उदजन-स्फोटकाच्या बाबतींत वरील अडचणी नसल्यामुळें खूपच मोठा व परिणामतः बलशाली असा स्फोटक करणें केवळ शक्यच नव्हे तर अिष्टहि ठरेल.

उदजन-स्फोटक अशा रीतीनें तयार करून त्याचा स्फोट घडवून आणला, तर साध्या परमाणुस्फोटकाच्या मानानें दसपट क्षेत्रापर्यंत (म्हणजे सुमारे २० मैलापर्यंत) खूप वेगानें सरकणाऱ्या हवेचा झंझावाती तडाखा बसेल. यामुळें या क्षेत्रांतील इमारती भुईसपाट होतील. स्फोटामुळें निर्माण होणारी ऊर्जा (एनर्जी) उष्णतेंत रूपांतरित होईल व उष्णतेचे झोत सुमारें ३० मैल व्यासाच्या क्षेत्रावर झपाट्यानें पसरतील. त्यामुळें ३० मैल व्यासाच्या क्षेत्रांत हवेच्या दाबाच्या तडाख्यां-तून वांचणारे प्राणी उष्णतेच्या झोतांत सांपडून होरपळून जातील. हें सारें होण्यास अवधि लागेल तो मात्र एका पळाच्या हजाराव्या भागाइतका !

परंतु याहिपेक्षां महाभयानक असा अनर्थ तेजोद्गर (रेडिओॲक्टिव्ह) पदार्थांची प्रचंड प्रमाणावर निर्मिति झाल्यामुळें घडून येऊं शकेल. मुद्दाम विनाशा-करितां केलेल्या उदजन-स्फोटकाचें कवच एका विशिष्ट द्रव्याचें बनवितां येईल. हें द्रव्य स्फोटानंतर बाहेर पड-णारे क्लीबाणू शोषून घेऊन एका नव्या दीर्घजीवी तेजोद्गर पदार्थांत रूपांतरित होऊं शकेल. साधारणतः १० चा २८ वा घात इतके नवे तेजोद्गर परमाणू तयार होतील. स्फोटानंतर उफाळणाऱ्या अतितप्त हवेच्या लोळांतून हे तेजोद्गर परमाणू आकाशांत खूप उंच जातील व सर्वत्र पूर्ववत् शांतता प्रस्थापित होईपर्यंत लांबवर पसरतील.

ज्या विज्ञानशास्त्र्यांना या तेजोद्गर विकिरणांच्या विनाशक महाशक्तीची कल्पना आहे ते तर सांगतात कीं ही रेडिओ–ॲक्टिव्ह डस्ट या पृथ्वीतलावरचा खूपसा भाग जीववसतीला केवळ दुःसहच नव्हे तर दीर्घकाळ निरुपयोगी करून टाकतील.

एक सहस्र परमाणुस्फोटकांच्या इतकी संहारक शक्ति असणारा एखादा उदजन-स्फोटक (हैड्रोजन बॉंब) जर मुंबई शहराच्या मध्यभागीं पडला तर ज्या प्रमाणांत अनर्थ घडेल त्याची कल्पना सामान्यतः खालीलप्रमाणें देतां येईल : झंझावाती हवेचा तडाखा (ब्लॅस्ट) अखिल बृहन्मुंबईला जबरदस्त रीतीनें जाणवेल. त्यामुळें बहुतेक साऱ्याच उभ्या इमारती क्षणार्धातच मुळासकट उखडून पडतील. स्फोटाच्या क्षणीं समुद्राच्या पाण्यावर पडलेल्या हवेचा प्रचंड दाब कमी होतांच पाणी वेगानें वर उफाळेल व सहस्रावधि मस्त हत्तींच्या शक्तीनें भरतीच्या लाटा किनाऱ्यालगतच्या भागांवर तडाखे हाणूं लागतील. प्रत्यक्ष स्फोटाच्या जागीं १० कोटी अंशापेक्षां कितीतरी अधिक उष्णता निर्माण होत असते. जसजशी ही उष्णता आसपासच्या हवेंत पसरेल तस-तशी तिची दाहकता कमी होत जाईल. तरीहि कल्याण-पर्यंतच्या भागांत खूपशा घन व द्रव पदार्थांची वाफ

होऊं शकेल. मुंबईसभोंवतीं पसरलेल्या सागराच्या पाण्याचें उष्णतामान अधिकच वाढेल. हा झाला प्रत्यक्ष स्फोटाच्या व नंतरच्या कांहीं क्षणांत झपाट्यानें होणारा अनर्थ! परंतु रेडिओॲक्टिव्ह धूळ हवेंत दूरवर भ्रमण करूं लागली कीं साऱ्या मुंबई इलाख्याला निष्प्राण करून टाकील. ही धूळ जमिनीवर स्थिरावतांच तिच्या संसर्गांत येणाऱ्या प्रत्येक पदार्थांचे परमाणू रेडिओ-ॲक्टिव्ह बनतील व त्यांतून भयानक विकिरणें (रेडिएशन्स) बाहेर टाकूं लागतील. हीं विकिरणें बाहेर पडण्याची क्रिया कित्येक महिनेपर्यंत किंवा वर्षें-पर्यन्तहि असूं शकेल. तोपर्यंत सर्व मुंबई-राज्य पूर्णतया उद्ध्वस्त, उजाड होऊन जाईल, वस्तीला निरुपयोगी बनेल.

अशा रीतीनें उदजनस्फोटक हें, परमाणुस्फोट-कांच्या विनाशक, संहारक, सर्वभक्षक शक्तीशीं तुलना केली असतांना केवळ जास्ती प्रमाणांतच नव्हे तर संहाराच्या प्रकारानंतर महाभयानक असल्याचें दिसून येतें. परमाणु-ऊर्जेचा विधायक उपयोग करणें शक्य-तच्या कोटींतील तरी आहे, पण उदजनस्फोटकांचा केवळ भस्मासुरी संहाराशिवाय दुसऱ्या कशासाठींहि उपयोग होणें सुतराम् अशक्य आहे! जुने स्फोटक (बॉम्ब्स) परमाणुस्फोटकांच्या आगमनानंतर अगदी क्षुद्र व दुर्बल भासूं लागले, जसे चंद्रोदयानंतर काजवे! पण उदजनस्फोटकांच्या उदयामुळें परमाणु-स्फोटकहि निस्तेज भासूं लागतील!

अशी ही संहारास्त्रांची वाढती श्रेणी आहे! मानव-जातीनें शतकानुशतकें अपार कष्ट सोसून उभ्या केलेल्या संस्कृतीच्या व सुधारणेच्या प्रासादाला पळार्धांतच जमीनदोस्त करण्याची शक्ति या नव्या अस्त्रांत आहे. राजकारणी सत्तालोलुपांच्या संघर्षाला कारणीभूत होणाऱ्या एकाद्या क्षुल्लक चुकीचा परिणाम सर्वनाशांत कसा होऊं शकेल याची कल्पना वरील वर्णनावरून येऊं शकेल.

---

## नको आता रेंगाळणें — !

फुलावेत मौनांतून नव्या गीतांचे ताटवे
माझ्या भावनांना आता रंग हवे नवे नवे !
भल्या सकाळीं पाहतों गर्द मखमली आकाश
निळया मनांत साजते लख्ख ताऱ्यांची आरास
हिर्वळीच्या नेत्रीं जुन्या ओथंबती आठवणी
अलगेच शहारते तृणफुलांत चिमणी
आजवरी रेंगाळलों याच कौतुकाच्या सवें
माझ्या भावनांना आता रंग हवे नवे नवे !
जरा कमानी–आडून पाही तगरीचा साज
जुईंतून नकळत हळूं निथळते लाज
आळसतो कळींतून गोड सुगंध मोकळा
मातीवर मोतियाचा कैफ लोळतो कोंवळा
क्षेपावती कौलांकडे लाख किरणांचे थवे
आजवरी रेंगाळलों याच कौतुकाच्या सवें !

उन्हातान्हाच्या प्रहरीं जेव्हां वेल भारावून
कुंपणाच्या तारेवर सुस्त रेलतसे मान,
मधूनच फुंकर ये जड वाऱ्याची कुठूनी
शेवग्याच्या सावलीची आणि थरारे पापणी !
अहेतुक हंसायाची हौस पानांचीहि निवे
आजवरी रेंगाळलों याच कौतुकाच्या सवें !
सांजकाळीं दाटून ये निळेपणांत काहूर
आणि विरक्तीचें शुभ्र ढगांवरती केशर
तेव्हां सातही सुरांचा सोसवेना छळवाद
अंतरांत उमटते खिन्न संगीताची साद
नको आतां रेंगाळणें याहि कौतुकाच्या सवें
माझ्या भावनांना आतां रंग हवे नवे नवे !

— राम शेवाळकर








आचार्य शं. द. जावडेकर

# भगवद्गीता आणि बुद्धिवाद

## बुद्धिवाद आणि ईश्वरवाद

श्री. कवीश्वर यांनीं प्रथमच अशी ग्वाही दिली आहे कीं, भगवद्गीतेंतील उपदेश हा शुद्ध बुद्धिवादी आहे. या त्यांच्या विधानाच्या एकदोन नैसर्गिक मर्यादा आपण गृहीत धरूनच त्यांच्या प्रतिपादनाचा विचार केला पाहिजे. भगवद्गीतेमध्यें ओश्वरवादा-संबंधीं दुहेरी भूमिका गृहीत धरलेली आढळून येते. एक भूमिका अशी कीं, " सर्व भूतमात्रांच्या अंतःकरणांत परमेश्वर उभा आहे व तो यंत्रारूढ अशा भूतमात्रांना आपल्या मायेनें फिरवीत आहे. त्याला शरण जा. त्याच्या प्रसन्नतेनें तुला परमशांति आणि शाश्वत स्थान प्राप्त होईल. सर्व भावांनीं त्याला शरण जाऊन तुला जशी इच्छा होईल तसा तूं वाग ". अशी ओश्वरासंबंधींची तृतीय पुरुषी भाषा ठिकठिकाणीं वापरलेली आहे. भगवद्गीतेच्या अेकंदर उपदेशाचा व नीतिशास्त्राचा हा अेक आधारभूत सिद्धांत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा आधारभूत सिद्धांत आजचे बुद्धिवादी गृहीत धरण्यास तयार नाहींत. अर्थात् भगवद्गीतेचा उपदेश शुद्ध बुद्धिवादी आहे असें म्हणणाऱ्यांनीं हा ओश्वरवादी सिद्धांत बुद्धीला पटवून देण्याचें कार्य अंगीकारिलें पाहिजे. तशा प्रकारचें विवेचन श्री. कवीश्वर यांनीं कोठेंहि केलेलें नाहीं. अर्थात् ओश्वरवाद हा सिद्धांत बुद्धिवादाला पटण्यासारखा आहे असें गृहीत धरून त्यांनीं सर्व विवेचन केलें आहे. आपल्या देशांत श्रीकृष्ण, गौतमबुद्ध आणि महावीर या तिघांच्या नांवांनीं तीन तत्त्वज्ञानांतील संप्रदाय रूढ झालेले आहेत. त्यांपैकीं श्रीकृष्णाचा संप्रदाय ईश्वरवादी, गौतमबुद्धाचा अज्ञेयवादी आणि महावीराचा निरीश्वरवादी असे आहेत. आजच्या बुद्धिवादाच्या दृष्टीनें मला त्यांपैकीं कोणताहि एक पूर्णपणें पटत नसला तरी बुद्धिवादी दृष्टीनें मला गौतमबुद्धाचा अज्ञेयवाद अधिक पटतो. मात्र स्पेन्सर किंवा मिल्ल यांचा अज्ञेयवाद आत्मानुभवाचा विचार न करणारा व त्याचें नैतिक व व्यावहारिक महत्त्व व मर्यादा न ओळखणारा असा असल्यामुळें तो मला पुरेसा वाटत नाहीं. आधुनिक बुद्धिवाद्यांपैकीं बर्ट्रांड रसेल यानें आत्मसाक्षात्काराचा अनुभव नैतिक दृष्ट्या महत्त्वाचा आहे, असें मान्य करून त्याची तात्त्विक मर्यादाहि सांगण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचा प्रयत्नहि अपुरा आहे, सदोष आहे असें मला वाटतें. तथापि त्या दिशेनें अधिक खोल विचार करून आत्मसाक्षात्काराच्या आधारावर ईश्वरवादाची उभारणी बुद्धिवादी दृष्टीनें करितां येईल किंवा नाहीं, याची छाननी केल्यावांचून भगवद्गीतेंतील विवेचन पूर्ण बुद्धिवादी आहे असें म्हणतां येणार नाहीं. श्री. कवीश्वर यांनीं असा कोणताहि प्रयत्न आपल्या पुस्तकांत केलेला नाहीं.

भगवद्गीतेंत ईश्वरवादासंबंधीं श्रीकृष्णाची आणखी एक भूमिका आहे. ती म्हणजे "मी ईश्वराचा अवतार असून सर्व धर्मांचा त्याग करून तूं मला शरण ये; म्हणजे मी तुला सर्व पापांपासून मुक्त होण्याचा मार्ग दाखवितों. " अशी ईश्वरासंबंधीं प्रथमपुरुषी वचनें आहेत. ईश्वरवादासंबंधींची ही भूमिका मला वाटतें, आजच्या बुद्धिवादापासून अधिकच दूर जाणारी आहे व ती जर आपण स्वीकारली तर भगवद्गीतेंतील विवेचन शुद्ध बुद्धिवादी आहे हें आपलें म्हणणें कोणासहि पटेलसें वाटत नाहीं. अर्थात् या भूमिकेनें बोलणाऱ्या लोकांच्या उद्गारांचें बुद्धिवादी दृष्टीनें रहस्य समजून घेणें अथवा समजावून देणें अगदींच अशक्य नाहीं. उदाहरणार्थ, स्वामी रामतीर्थ हे आपला

---

इंदूरचे प्रा. ग. वा. कवीश्वर यांनीं आपल्या **'गीतातत्त्वदर्शन'** या पुस्तकांत, **आचार्य शं. द. जावडेकर** यांच्या पूर्वी ' नवभारतांतील'ल लेखांतून प्रकट झालेल्या गीताविषयक विचारसरणीसंबंधीं आपलें मत व्यक्त केलें आहे. प्रस्तुत स्थळीं **आचार्य शं. द. जावडेकर** यांनीं **प्रा. कवीश्वरांच्या** पुस्तकांतील कांहीं मूलभूत सिद्धान्तांचा विचार केला असून आपले गीताविषयक विचार या निमित्तानें पुन्हां मांडले आहेत. — का. सं.








उल्लेख ' मी ' या शब्दानें न करितां ' राम ' या तृतीय पुरुषी नांवानें करितात. श्रीकृष्णाची भूमिका कांहींशी यासारखीच आहे. पण या भूमिका आपण समजूं शकलों तरी त्यांचें समर्थन करितां येईलसें वाटत नाहीं. भगवद्गीतेंतील ' मी ईश्वर आहे ' या भूमिकेनें लिहिलेले श्लोक जर गाळून टाकावयाचें म्हटलें तर त्यांची संख्या सुमारें अडीचशें भरेल. ते गाळून टाकून पहिल्या भूमिकेनें लिहिलेले श्लोक ठेविले, तरी ईश्वरवादी सिद्धान्तावर आधारलेलें एक सुसंगत नीतिशास्त्र उरतें. या पुस्तकाची पहिली आवृत्ति अशीच असावी व नंतर श्रीकृष्ण हा विष्णूचा अवतार आहे असें मानणाऱ्या सांप्रदायिकांनीं त्याची दुसरी आवृत्ति तयार केली असेंहि मानणें अशक्य नाहीं. पण बुद्धिवादाच्या दृष्टीनें या दोनहि भूमिका आजच्या मनुष्यांना मान्य होतीलच असें गृहीत धरून लिहिलेलें हें पुस्तक आज तरी समाधानकारक म्हणतां येत नाहीं. विशेषतः ज्यांना भगवद्गीतेंतील विवेचन शुद्ध बुद्धिवादी आहे असें सिद्ध करावयाचें असेल त्यांनीं या दोन भूमिकांतील ईश्वरवादाचा विचार केल्यावांचून त्यांचें लेखन समाधानकारक ठरणार नाहीं.

### समाजशास्त्र अशाश्वत, मोक्षशास्त्र शाश्वत

' वर्णाश्रमधर्मानुसार प्राप्त होणारीं कर्तव्यें निष्काम आणि अनासक्त वृत्तीनें करीत राहिल्यास मनुष्याला मोक्ष प्राप्त होतो आणि सर्वभूतहित अथवा लोकसंग्रह साधिल्याचें श्रेयहि मिळतें. म्हणून प्रत्येकानें वर्णाश्रमानुसार प्राप्त कर्तव्यें करीत राहावें ' असाहि बोध भगवद्गीतेंत आहे आणि हें कर्तव्य अनासक्त बुद्धीनें करावें असाहि बोध आहे. टिळकांचें असें म्हणणें आहे कीं भगवद्गीतेंतील निष्काम कर्तव्याचरणाचा किंवा अनासक्त राहून कर्तव्याचरण करण्याचा हा मार्ग इतका महत्त्वाचा आहे कीं ज्या समाजांत वर्णाश्रमधर्म रूढ नाहीं त्या समाजांनाहि तो मार्ग उन्नतिकारक होण्यासारखा आहे. अर्थात् टिळक जेव्हां असें म्हणतात तेव्हां तें मत भगवद्गीतेंत आहे असें ते म्हणत नाहींत. टिळकांच्या मतानें वर्णाश्रमसंस्था ही समाजरचनेची एक पद्धति असून ती सार्वकालिक नाहीं. ती सोडून दिली तरीहि गीतेचा निष्काम कर्माचरणाचा उपदेश महत्त्वाचा राहील. भगवद्गीतेंत " चातुर्वर्ण्य हें मीं निर्माण केलेलें आहे, त्याचा मी कर्ताहि आहे व अकर्ताहि आहे आणि तें मी गुणकर्मानुसार निर्माण केलेलें आहे " असे तीनचार सिद्धांत आहेत. यांपैकीं सर्व सिद्धान्त सारखेच महत्त्वाचे धरले तर वर्णाश्रमधर्मांत सुधारणा करण्यास अथवा तो मोडून दुसरी समाजव्यवस्था करण्यास प्रत्यक्ष ईश्वराशिवाय किंवा ईश्वराच्या अवताराशिवाय कोणासहि अधिकार उरत नाहीं. मग वर्णाश्रमधर्म हा निष्काम धर्माचरणाच्या मोक्षधर्माइतकाच सनातन बनतो. टिळकांच्या मतानें निष्काम कर्तव्याचरणाचा सिद्धान्त तेवढाच सनातनधर्म असून वर्णाश्रमधर्माची समाजपद्धति तितकी सनातन नाहीं. त्यांना भगवद्गीतेंतील मोक्षशास्त्र आणि त्यानें लोकसंग्रहशास्त्राशीं साधलेला समन्वय एवढीच सनातन वस्तु वाटते व वर्णाश्रमधर्म ही देशकालानुसार बदलणारी अशाश्वत वस्तु वाटते. भगवद्गीतेंतील उपदेशांत शाश्वत आणि अशाश्वत असा भेद करून, तिच्यांतील मोक्षशास्त्र शाश्वत आणि लोकसंग्रहबुद्धि शाश्वत परंतु तिच्यांतील समाजशास्त्र अशाश्वत व बदलणारें असा भेद करून टिळकांनीं आपलें विवेचन केलेलें आहे. त्यामुळें वर्णाश्रमधर्म न मानणाऱ्यांना सुद्धां भगवद्गीतेची महती पटूं लागली. परंतु सनातनी लोकांना टिळकांचें मत पटेनासें झालें. आणि त्या मताला गीतेचा आधार नाहीं असें ते म्हणूं लागले. केवळ शब्दप्रामाण्याच्या दृष्टीनें विचार केल्यास सनातनी लोकांचें म्हणणें मान्य करावें लागेल. पण ही विचारसरणी बुद्धिप्रामाण्याच्या दृष्टीनें मुळींच टिकण्यासारखी नाहीं.

### कर्माच्या परिणामाचें विवेचन

टिळकांनीं मोक्षशास्त्र व निष्काम कर्म यासंबंधींचे गीतेचे विचार तिच्यांतील समाजशास्त्रापासून अलग करून मांडले असल्यामुळें त्यांच्या विवेचनांत ' कर्माचें फळ लक्षांत घेतलें पाहिजे ' या मुद्द्याकडे थोडें दुर्लक्ष झाल्यासारखें भासतें. यामुळेंच कर्म केवळ निष्काम असून भागत नाहीं, तें कार्यहि असलें पाहिजे म्हणजे समाजरचनेनुसार आपलें कर्तव्य असलें पाहिजे या मुद्द्यावर भर देऊन श्री. कवीश्वर यांनीं टिळक व गांधी या दोघांवरहि टीकेचें हत्यार उपसलें आहे. कांहीं प्रमाणांत त्यांचा हा आक्षेप योग्य असून कर्माच्या परिणामाकडे लक्ष देण्याचें महत्त्व निष्कामत्वाचें व अनासक्तीचें महत्त्व वर्णन करण्याच्या भरांत टिळक व गांधी विसरतात असें म्हणतां येईल. केवळ बुद्धीची










शुद्धता किंवा सद्वृत्ति यांचीच महती वर्णन करण्याच्या भरांत कान्टनें कर्माच्या परिणामाकडे दुर्लक्ष केलें अशी टीका कान्टवर अनेकांनीं केली आहे. त्याच प्रकारची टीका श्री. कवीश्वर यांनीं टिळक व गांधी या दोघांवरहि केलेली आहे. ती महत्त्वाची असली तरी सर्वस्वीं खरी आहे असें मात्र मला वाटत नाहीं. समाजशास्त्रीय तपशीलाकडे टिळक व गांधी यांनीं विशेष लक्ष दिलें नसलें तरी लोकसंग्रहदृष्टीनेंच निष्काम कर्माची अथवा अनासक्त कर्तव्याचरणाची महती ते वर्णन करितात हें लक्षांत घेतल्यास त्यांनीं कर्माच्या फलाकडे दुर्लक्ष केलें हा आक्षेप टिकणार नाहीं. मात्र कर्तव्यशास्त्राचें विवेचन केवळ बुद्धीच्या अनासक्त व निष्काम स्वरूपाचें विवेचन करून संपत नाहीं. कर्माच्या परिणामाचें विवेचनहि तितकेंच महत्त्वाचें आहे. या मुद्याचें विवेचन कवीश्वर यांनीं जें केलें आहे तें बरेंच समर्पक व अवश्य आहे असें मला वाटतें.

## अर्जुनाचा ममत्वयुक्त मोह

भगवद्गीतेमध्यें कार्याकार्य ठरविण्याच्या बाबतींत शास्त्र हेंच प्रमाण मानावें असें म्हटलें आहे. येथें शास्त्र म्हणजे काय व तें कोणतें असा प्रश्न उपस्थित होतो. माझ्या मतें हें शास्त्र म्हणजे वर्णाश्रमधर्मशास्त्र असा गीतेचा अभिप्राय असून त्याचा व्यापक अर्थ कोणत्याहि समाजाचें रूढ समाजशास्त्र असा करितां येईल. गीताकाराच्या पुढें वर्णाश्रमधर्माचें अथवा चातुर्वर्ण्याचें शास्त्र असून त्या शास्त्रानुसार धर्मयुद्ध हें क्षत्रियांचें कर्तव्य असून अर्जुनहि जन्मानें व गुणकर्मानें अथवा प्रकृतिगुणानुसार क्षत्रिय होता. "मी युद्ध करणार नाहीं. मला कौरवांनीं मारिलें अथवा मला भिक्षा मागावी लागली तरी मी त्याला तयार आहे. पण राज्यसुखाच्या लोभानें मी स्वजनांना मारण्याचें पाप करणार नाहीं" असें तो म्हणत होता. "आम्ही राज्यसुखाच्या लोभानें स्वजनांना मारण्यास प्रवृत्त झालों आहों व तसें करणें हें पाप आहे" असें तो म्हणत होता. श्रीकृष्णानें त्याचें हें मत खोडून काढून त्याला असें सांगितलें : "हें युद्ध तुम्ही राज्यसुखासाठीं व स्वजनांविरुद्ध करीत आहांत ही दृष्टि सोडून दे. दुर्जनांना पराभूत करून न्यायसंस्थापना करण्यासाठीं तुम्ही लढत आहांत. न्यायसंस्थापनेसाठीं दुर्जनांचा विनाश करणें यांत पाप नसून तो क्षत्रियांचा पवित्र धर्म आहे, ही दृष्टि स्वीकारून न्यायसंस्थापना करीत असतांना स्वजन-परजन हा भेद करणें भ्रमोत्पादक आहे. तेथें सज्जन-दुर्जन किंवा सत्पक्ष-असत्पक्ष एवढाच भेद करणें योग्य आहे. असत्पक्ष घेऊन युद्धास उभे राहिलेले लोक स्वजन असले तरी त्यांना नष्ट केलें पाहिजे. हें तुझें शास्त्रसिद्ध कर्तव्य असून तें कर्तव्य करण्यानें पाप लागेल हा तुझा भ्रम आहे. शिवाय तुझी क्षत्रियप्रकृति तुला लढविल्यावांचून राहणार नाहीं. मी भिक्षा मागेन आणि कौरवांनीं आम्हांला मारिलें तरी तें निमूटपणानें सहन करीन ही तुझी भाषा अहंकाराची आहे. ती तुझी प्रकृतिसिद्ध स्वाभाविक वृत्ति नाहीं. हा अहंकार टिकणार नाहीं. या अहंकारांतून आणि भीष्मद्रोणादि पूज्य विभूतींच्या ममत्वांतून मुक्त होऊन निरहंकार व निर्मम वृत्तीनें हें धर्मयुद्ध तूं करशील आणि फलाविषयीं पूर्ण अनासक्त राहशील तर तूं आपलें आत्मकल्याण साधशील आणि लोकसंग्रहाला सहायभूत होशील."

अर्जुन व श्रीकृष्ण यांच्या दृष्टींतील हा भेद मूलग्राही आहे. अर्जुनाची दृष्टि स्वजन-परजन-भेदावर उभारलेली असून, 'आपण न्यायासाठीं लढत आहोंत' हा दृष्टिकोण सोडून तो 'आपण राज्यसुखासाठीं लढत आहोंत' एवढाच दृष्टिकोण बोलत आहे, हें लक्षांत घेतल्यास तो ममत्वानें मोहित झाला आहे हें जें त्याच्या मनाचें पृथक्करण शंकराचार्य, रामानुज, ज्ञानेश्वर, टिळक व गांधी या सर्वांनीं केलें आहे तें स्थूल मानानें बरोबर आहे असेंच मला वाटतें. दुर्योधन, दुःशासन इत्यादि चारपांच अत्यंत दुष्ट व्यक्तींबद्दल त्याला ममता वाटत नसली पाहिजे, एवढें कवीश्वर यांचें मत खरें असलें तरी भीष्म-द्रोणांच्याबद्दल ममत्वानें त्याचें अंतःकरण भरून आलें होतें हें त्याच्या शब्दांत इतकें निःसंदिग्धपणें प्रकट झालें आहे कीं त्यावेळीं त्याला आपल्या क्षात्रधर्माचा विसर पडला होता व 'आपली क्षात्रवृत्ति आपण सहज झुगारून देऊं' असा अहंकारहि त्याला यावेळीं वाटत होता, हें कोणालाहि नाकारितां येणार नाहीं. पण तो ती वृत्ति झुगारून देऊन पूर्ण संन्यस्त बनला होता असेंहि म्हणतां येत नाहीं. तोच स्वतःला 'धर्मसंमूढचेताः' असें म्हणवीत आहे आणि "मला माझें कर्तव्य नीट समजत नाहीं, तें तूं मला सांग" असें म्हणून तो








श्रीकृष्णाला शरण गेला आहे. त्याची बुद्धि स्थिर झालेली नव्हती. बुद्धि स्थिर बनवून आपलीं कर्तव्यें अनासक्त व निष्काम बुद्धीनें करीत राहण्याचें शास्त्र भगवद्‌गीतेंत सांगितलेलें आहे. मनुष्याला सदसद्‌विवेक करण्यांत लागणारी बुद्धि निर्विकार आणि इन्द्रियवृत्तींच्या अधीन न होणारी अशी असली पाहिजे हें भगवद्‌गीतेचें रहस्य आधुनिक बुद्धिवाद्यांनीं आत्मसात् केलेंच पाहिजे. बुद्धीला शुद्ध बनविणें हा भगवद्‌गीतेच्या अध्यात्माचा निष्कर्ष असून स्थितप्रज्ञ अवस्था, ब्राह्मी स्थिति अथवा ब्रह्मनिर्वाणप्राप्ति या सर्व शब्दांचा अर्थ मी एवढाच समजतों. टिळकांनीं व गांधींनीं आधुनिक बुद्धिवाद्यांना या तत्त्वांचें महत्त्व पटवून देण्याचा प्रयत्न केला असून भगवद्‌गीतेचा हा संदेश आजच्या बुद्धिवादी नीतिशास्त्रानेंहि आत्मसात् केला पाहिजे असें मलाहि वाटतें. पण त्याचबरोबर भगवद्‌गीतेनें जें तत्कालीन समाजशास्त्र गृहीत धरलेलें आहे, त्या समाजशास्त्रांत महत्त्वाची भर घालून नवें समाजशास्त्र निर्माण केल्यावांचून आजच्या कर्तव्यशास्त्राचें अथवा 'कार्याकार्यव्यवस्थिती'चें योग्य निदर्शन करितां येणार नाहीं.

भगवद्‌गीतेंतील समाजशास्त्रानें मोक्ष व लोकसंग्रह असें द्विविध ध्येय आपल्यापुढें ठेविलें आहे. हें द्विविध ध्येय आजहि आपण समाजशास्त्राकडून मान्य करवून घेतलेंच पाहिजे. तथापि भगवद्‌गीतेंतील समाजशास्त्रांत युद्धसंस्था आणि सामाजिक वर्गसंस्था ( चातुर्वर्ण्य ) या दोनहि संस्था लोकसंग्रहाला अपरिहार्यतेनें आवश्यक आहेत, असें गृहीत धरलें आहे. श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांनाहि या दोन संस्था मान्य आहेत. अर्जुन फक्त स्वजनांविरुद्ध युद्ध टाळूं पाहात आहे. पण सर्वच युद्धसंस्था आज नाहींशी केली पाहिजे अशी त्याची भूमिका नाहीं. म्हणूनच अर्जुनाची भूमिका ही अहिंसेची भूमिका नव्हे असें गांधी व विनोबा म्हणतात. श्री. कवीश्वर असें म्हणतात कीं अर्जुनाची भूमिका शुद्ध अहिंसेचीच आहे; पण ती अहिंसा त्यानें स्वजनापुरती मर्यादित केली आहे. पण अहिंसावृत्ति स्वजनांपुरती मर्यादित करणें या भूमिकेला अहिंसेची भूमिका म्हणणें मला योग्य वाटत नाहीं. हिंसा-अहिंसेचा विवेक करितांना स्वजन-परजन असा भेद करणें ही अहिंसा कशी ? दुर्जन-सज्जन असा भेद करणें हें श्रीकृष्णास मान्य असून तें सदसद्विवेकावर उभारलेलें असल्यानें नीतिशास्त्राला संमत म्हणतां येतें. याला फार तर मर्यादित अहिंसावृत्ति म्हणतां येईल. पण केवळ स्वजनांशीं अहिंसा आणि ते स्वजन दुष्टाचे पक्षपाती असले अथवा अन्यायाचे पक्षपाती असले तरीहि त्यांच्याशीं अहिंसा हें तत्त्व अहिंसातत्त्व होऊं शकत नाहीं. तो एक ममत्वांतून उत्पन्न झालेला मोहच समजला पाहिजे. म्हणूनच अर्जुनाच्या मानसाचें मंथन करणाऱ्या आजपर्यंतच्या सर्व टीकाकारांनीं अर्जुनावर ममत्वयुक्त मोहाचा आरोप केलेला आहे व तो योग्य आहे.

## गीतेंतील समाजशास्त्र आज अपुरें

टिळकांनीं चातुर्वर्ण्याची समाजरचना हा भगवद्‌गीतेचा सनातन बोध नव्हे, केवळ निष्काम कर्तव्याचरण आणि लोकसंग्रहबुद्धि एवढाच गीतेचा सनातन उपदेश आहे असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें 'युद्ध कर' हा तिच्यांतील उपदेश सनातन नसून योगस्थ होऊन कर्तव्याचरण कर एवढाच त्या उपदेशांतील सनातन भाग आहे आणि ' युद्ध कर ' हा त्या वेळच्या समाजरचनेनें मान्य केलेला म्हणजे त्यावेळच्या समाजशास्त्राचा क्षात्रधर्मांतील एक आदेश आहे व तो सनातन नाहीं' असें गांधी समजतात. भगवद्‌गीतेंतील उपदेशापैकीं कांहीं उपदेश सनातन व इतर युगायुगानुसार बदलणारे असा विवेक गांधी व टिळक या दोघांनीं केलेला आहे. ' योगस्थः कुरु कर्माणि ' आणि ' मामनुस्मर युध्य च ' हे दोनहि आदेश गांधींनाहि पटतात. पण त्यांपैकीं ' युध्य ' या शब्दाचा अर्थ ते बदलून घेऊं इच्छितात. " युध्य किंवा युद्ध कर पण तें अहिंसावृत्तीनें व निःशस्त्र कर " असा ते बोध घेतात. पूर्वीच्या रूढ शब्दांचा अर्थ बदलून त्यांत नवा अर्थ बसविण्याचा मार्ग गीताकारानेंच दाखवून दिला आहे असें म्हणून त्यांनीं त्याचें उदाहरण म्हणून यज्ञ शब्दाचा उल्लेख केलेला आहे. सत्याग्रह हा न्यायासाठीं व धर्मासाठीं लढण्याचा एक शस्त्रयुद्धाहून श्रेष्ठ असा पर्याय आहे असें गांधी मानतात. चातुर्वर्ण्याप्रमाणें युद्धसंस्था ही सुद्धां अजीबात नष्ट केल्यावांचून आज लोकसंग्रह होऊं शकत नाहीं असा टिळकांच्या व गांधींच्या शिक्षणापासून मी बोध घेतों. आजच्या समाजशास्त्रानें वर्गभेद व राष्ट्रभेद नष्ट करून सर्व








मानवजातीचें एक राज्य निर्माण केलें पाहिजे आणि एकवर्ग समाजघटना रूढ केली पाहिजे अशी अवस्था आज मानवाच्या भौतिकशास्त्रांतील व समाजशास्त्रांतील प्रगतीमुळें प्राप्त झालेली आहे. यामुळें भगवद्गीतेंतील चातुर्वर्ण्याला व युद्धसंस्थेला मान्यता देणारें समाजशास्त्र आज अपुरें व तोटकें भासत आहे. गांधींच्या व टिळकांच्या लिखाणापासून मी असा बोध घेतों.

## नीतिशास्त्राला अध्यात्माचें अधिष्ठान

भगवद्गीतेंतील अध्यात्मशास्त्रानें ईश्वरवाद आणि अवतारवाद मान्य केलेले आहेत. हे दोनहि वाद टिळक व गांधी या दोघांनीं 'आपल्या बुद्धीस पटतात, निदान ते आपल्या अंतःकरणास पटतात' असें म्हटलें आहे. पण माझ्या बुद्धीस व अंतःकरणासहि हे दोन वाद अद्यापि पटलेले नाहींत. तथापि ईश्वरवाद व अवतारवाद मान्य करण्याची दृष्टि अगदीं अंधःश्रद्धेची आहे असें मात्र मला वाटत नाहीं. या बाबतींत मी अज्ञेयवादी आहे आणि ईश्वरवाद व अवतारवाद या कविकल्पना आहेत असेंच मला वाटतें. मात्र ईश्वरसाक्षात्कार असें ज्याला म्हणतात तो एक विशिष्ट आत्मानुभव आहे व तो आत्मानुभव घेण्याचा प्रयत्न करीत राहिल्यानें वृत्ति 'आत्मवत् सर्वभूतानि' या प्रकारची बनून बुद्धि नैतिक कर्तव्याचरणांत रममाण होऊं शकते आणि अंतःकरण प्रसन्न राहून सत्यासाठीं म्हणजे सर्वहितासाठीं स्वार्थाचा त्याग करण्यांत संतोष मानण्याची प्रवृत्ति अंतःकरणांत उदय पावते, हें सर्व माझ्या बुद्धीला पटतें व अंतःकरणालाहि त्याचा थोडाफार अनुभव येतो. त्याच दृष्टीनें नीतिशास्त्राला अध्यात्माचें, स्थितप्रज्ञावस्थेचें, ब्रह्मनिर्वाणप्राप्तीचें अथवा निर्वाणपदप्राप्तीचें अधिष्ठान असलें पाहिजे हें गीतेचें, टिळकांचें व गांधींचें मत मला पटतें व तें बहुमोल वाटतें. टिळकांनीं व गांधींनीं भगवद्गीतेपासून आज सुद्धां कोणत्या गोष्टी शिकतां येतील व शिकण्यासारख्या आहेत त्याच्याच विवेचनावर सर्व भर दिलेला आहे. तितका भर त्यांनीं भगवद्गीतेच्या उपदेशाच्या पुढें आपण कोठें व किती गेलें पाहिजे या प्रश्नाच्या विवेचनावर दिलेला नाहीं. तरीहि त्यांनीं तिच्या उपदेशापैकीं कांहीं भाग सनातन व कांहीं अशाश्वत असा भेद आपल्या विवेचनांत केलेला आहे. या सर्व बाबतींत अधिक स्पष्टीकरण करून निःसंदिग्धता निर्माण करण्याची गरज आज निर्माण झाली आहे. अशा परिस्थितींत श्री. कवीश्वर यांचें पुस्तक बुद्धिवादाच्या कसोटीला उतरणार नाहीं, इतकेंच नाहीं तर टिळकांनीं व गांधींनीं कांहीं बाबतींत निःसंदिग्धता स्वीकारली नसली तरी त्यांनीं भगवद्गीतेपासून आज आपणांस कोणता बोध घेतां येईल या बाबतींत बुद्धिमंतांना पटेल असा पुष्कळच निःसंदिग्ध उपदेश केलेला आहे. त्यांचें भगवद्गीतेचें विवेचन श्री. कवीश्वर यांच्या पुस्तकाहून मला बोधप्रद व बुद्धिवादी वाटतें. त्यांपैकीं टिळकांच्या विवेचनाचा परामर्श श्री. कवीश्वर यांनीं एकंदरींत समाधानकारक घेतलेला आहे. पण गांधीवादी दृष्टिकोण त्यांनीं समजूनच घेतलेला नाहीं असें मला वाटतें.

वरील विवेचनांत मी बुद्धि आणि अंतःकरण हे दोन शब्द मुद्दाम योजिलेले आहेत. मनुष्यानें नीतिशास्त्राचा विचार करीत असतां बुद्धि व अंतःकरण या दोहोंचीहि शुद्धि करून व दोहोंचाहि कल घेऊन वागलें पाहिजे असें मला सुचवावयाचें आहे. बुद्धि अव्यभिचारी वृत्तीनें सत्यनिष्ठ आणि अंतःकरण निर्विकार व निःपक्षपाती प्रेमानें म्हणजेच सर्वभूतहितावरील प्रेमानें भरलेलें असलें पाहिजे. प्रेमभावना ममत्वानें संकुचित बनल्यामुळें ती ममत्वाच्या कक्षेंत न येणाऱ्यांचा द्वेष करूं लागते व अखेरीस या ममत्वाच्या विकृतीनें तिचें रूपांतर द्वेषांत होतें. तसेंच बुद्धीला अनेक प्रकारचे अहंकार पछाडीत असतात व त्या अहंकारामुळें ती असत्याला सत्य व अनीतीला नीति मानूं लागते. म्हणून निरहंकार व निर्मम वृत्ति यांचें महत्त्व अध्यात्मशास्त्रानें वर्णिलें आहे. बुद्धि तत्त्वनिष्ठ आणि अंतःकरण प्रेममय झाल्यानेंच सर्वात्मभावना जागृत राहते. ही सर्वात्मभावना आणि तत्तत्कालीन समाजशास्त्र या दोहोंचाहि आधार घेऊन मनुष्याला सामाजिक कर्तव्यें करावीं लागतात. तत्तत्कालीन समाजशास्त्रास अनुसरून चालणारांना तत्कालीन शास्त्रानें जेवढी हिंसा लोकसंग्रहाला अपरिहार्य म्हणून मान्य केली असेल तेवढी करण्यांत पाप मानण्याचें कारण नाहीं. पण रूढ समाजशास्त्रांत ज्याला क्रांति करावयाची असेल त्यानें शास्त्राचे विधिनिषेध झुगारून सामाजिक बंधनें लोकसंग्रहबुद्धीनें तोडण्यासहि हरकत नाहीं. पण हीं बंधनें तोडणाऱ्यांनीं हिंसेचा यत्किंचित्हि







आश्रय करूं नये असें म० गांधींचें सत्याग्रही तत्त्व दिसतें. ' निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः । ' याप्रमाणें ज्यांना वागावयाचें असेल त्यांनीं वागावें पण त्यांनीं सत्याचें व अहिंसेचें उल्लंघन करूं नये असें गांधी मानतात. सत्य व अहिंसा पाळणाऱ्यांनीं लोकसंग्रहासाठीं समाजशास्त्रांतील जुने विधिनिषेध मोडून नवे विधिनिषेध घालून द्यावेत असें सत्याग्रही क्रांतिशास्त्र आहे. पण हें शास्त्रांत क्रांति करण्याचें शास्त्र भगवद्‌गीतेंत आहे असें मला वाटत नाहीं व तसें गांधींनींहि म्हटलेलें नाहीं. भगवद्‌गीता ' तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते ' एवढें म्हणून थांबते. टिळक समाजशास्त्र बदलणारें शास्त्र आहे असें म्हणतात. पण हा बदल घडवून आणण्याचें शास्त्र सांगत नाहींत. गांधींनीं जुनें शास्त्र उल्लंघून नवें शास्त्र निर्माण करण्याचें क्रान्तिशास्त्र सत्याग्रहाच्या रूपानें भारताला दाखवून दिलें. म्हणून गांधी हे श्रीकृष्णाच्या व टिळकांच्या पुढें गेले आहेत असें मी म्हणतों : असें म्हणण्यांत गांधी श्रीकृष्णाच्या पुढें गेले हें माझें मत खरें असो किंवा नसो मी मात्र गांधींच्या पुढें गेलों आहे असा उपरोधात्मक उल्लेख श्री. कवीश्वर यांनीं माझ्या या विचारसरणीचा केला आहे. माझी विचारसरणी या पुस्तकाच्या वाचकांच्या लक्षांत यावी म्हणून या ठिकाणीं मी ती श्री. कवीश्वर यांच्या ' गीतातत्त्वदर्शना 'च्या संक्षिप्त समालोचनाच्या निमित्तानें थोडक्यांत मांडली आहे.

## धरणयोजना – आणि सांस्कृतिक पुराण अवशेष

आपल्या देशांतील धरणयोजनांपैकीं सरकारनें कांहीं हातीं घेतल्या आहेत व इतर हातीं घेणार आहे. ज्या नद्यांच्या परिसरांत हे कालवे खोदले जाणार आहेत त्या ठिकाणीं प्राचीन संस्कृतीचे अवशेष सांपडण्याची फार मोठी शक्यता आहे. कालवे खणतांना हे अवशेष नष्ट होऊं नयेत म्हणून **एंजिनिअरांबरोबर पुराणवस्तु-संशोधकहि** सरकारनें पाठविले पाहिजेत. याबाबतींत **सोव्हिएट रशियाचें** उदाहरण पहाण्यासारखें आहे : महायुद्धाच्या वेळची गोष्ट. जर्मन सैन्य त्यावेळीं रशियांत खूप आंतपर्यंत घुसलेलें होतें. अजून लढाईचें पारडें फिरलेलें नव्हतें. रशियाला अधिक धान्याची जरूरी होती. रशियापुढें जीवनमरणाचा प्रश्न उभा होता. अशा वेळीं मध्य आशियांतील फरगाणा प्रांतांत शेंकडों मैल लांबीचा कालवा खणण्यांत येऊन हजारों एकर पडीक जमीन लागवडीखालीं आणण्यांत आली. परंतु अशा आणीबाणीच्या प्रसंगींहि, जेथून प्राचीन काळीं चीनमधील रेशमाच्या व्यापाराचा मार्ग होता, तेथून हा कालवा काढण्यांत येत आहे याची जाणीव त्या राष्ट्राला होती. याच विभागांत पूर्वीं विशाल आणि सुंदर नगरें वसलेलीं होती हें या प्रसंगींसुद्धां तें राष्ट्र विसरलें नाहीं. तेथील सांस्कृतिक अवशेष नष्ट होऊं नयेत व संशोधकांना कायमचा या अवशेषांचा उपयोग करतां यावा म्हणून कालवा काढीत असतांना एंजिनिअर व ओव्हरसिअर्सप्रमाणें **पुराणवस्तुसंशोधकांचीहि** नेमणूक करण्यांत आली होती. तेथील शेतकरी निरक्षर नव्हते. परंतु सर्वांनाच प्राचीन सामग्रीचें मूल्य समजत होतें असें नाहीं. म्हणून त्यांच्या भाषेंत लहानलहान पुस्तिका छापून वाटण्यांत आल्या. आणि या सर्व दक्षतेचा परिणाम म्हणजे या कालव्याच्या उत्खननांत एक मोठें संग्रहालय भरेल इतकी प्राचीन इतिहासाची साधनसामग्री सांपडली. खऱ्या संस्कृतिप्रेमाचें हें सुंदर उदाहरण आहे.

– **राहुल सांकृत्यायन** यांच्या ' जनयुग ' (दिल्ली)मधील लेखांतून–अनु० **श्री. रतनलाल भंडारी.**



अनुक्रमणिका






श्री. मधुकर रा. इनामदार

# मोडी अक्षराची कुळकथा

मोडी अक्षराची सुरुवात महाराष्ट्रांत इ. स. १२६० ते १३०९ च्या दरम्यान झाली. महादेव व रामदेवराव यादवांच्या वेळीं महामंत्री हेमाडपंतानें दप्तराच्या कामासाठीं मोडी लिपीचा अवलंब केला. इ. स. १२६० पासून हेमाडपंत यादवराज्यांत दफ्तरदार होता. त्या सुमारास उत्तर हिन्दुस्थानांत मुसलमानी राज्याची सुरुवात होऊन ऐशींनव्वद वर्षे झालीं होतीं. सिंघण यादवानें माळवा वगैरे विंध्यपर्वतापलीकडील भाग महाराष्ट्रराज्यास जोडले होते. याच वेळीं मराठे व मुसलमान यांचा प्रामुख्यानें प्रथम संबंध आला. कागद तयार करण्याची मुसलमानी कला याच सुमारास महाराष्ट्रांत आली.

या संधिकालामध्यें दफ्तरदार हेमाडपंताला वेगानें लिहितां येणें शक्य अशा मोडी लिपीची देशी कल्पना सुचली. मुसलमानी लेखनपद्धतींत शिकस्ता-लेखन-पद्धतीनें मोडून करकर लिहितां येत असे. त्याचप्रमाणें नागरी लिपीचा उपयोग करून अक्षरें मोडून करकर लिहितां येईल अशा पद्धतीचा परिश्रमपूर्वक शोध हेमाडपंतानें दफ्तराच्या कामासाठीं लावला.

मुसलमानांची नस्ख व शिकस्ता लेखनपद्धति आपल्याकडील बाळबोध – व – मोडीप्रमाणेंच आहे. शिकस्ता-लेखनपद्धति वेगवती व अक्षरें मोडून लिहिली जाते. नस्ख लेखनपद्धति बाळबोध मराठीप्रमाणें स्पष्टपणें लिहिली जाते. शिकस्तन् = मोडणें असा फारशींत अर्थ होतो. शिकस्ता-लेखनांत, खडें अक्षर मोडून लिहिलें जातें. यावरून नागरी लिपीला वळण देऊन हेमाडपंतानें देशी लेखनपद्धति शोधिली व शिकस्ता या शब्दाचें 'मोडी' हें सरळ भाषान्तर करून या लिपीचें नामकरण केलें व आपल्या संशोधित लिपीला सुयोग्य असा नवा शब्द रूढ केला. यापूर्वी महाराष्ट्रामध्यें बाळबोध लेखनपद्धति रूढ होती.

त्यावेळेपासून आजतागायत मोडी लिपी व्यवहारांत आहे. भरतखंडांतील कोणत्याहि लेखनपद्धतीला मोडी वळण आढळून येत नाहीं. हा प्रकार फक्त महाराष्ट्रांतच नागरी लिपींत आढळून येतो. पूर्वकालापासून पेशवाई – अखेर व अगदीं परवा – परवापर्यंतचें महाराष्ट्रीय सरकारी दरबारी व इतर लेखन, मोडी वळणांतच आढळून येतें. पेशवाईच्या अखेरीनंतर इंग्रजी राजवट सुरू झाल्यानंतर देखील बऱ्याच साहेबलोकांच्या सहीचें मोडी अक्षर असलेले कागद ऐतिहासिक दप्तरांत सांपडतात. अद्याप देखील गेल्या पांचपंचवीस वर्षांच्या कालांतील कारकुनी कामें, व्यापाऱ्यांचीं हिशोबाचीं कामें मोडींत आढळतात. खेड्यांतील जुन्या पिढींतील हयात मंडळी मोडींतच अद्याप लिखाण करतात. शिक्षणक्रमांत पण मोडी लिपी मुलांना इयत्ता तिसरीपासून सातवीपर्यंत मराठी शाळेंत शिकविली जाते.

मोडी लिपीच्या शोधाची कल्पना हेमाडपंतास मुसलमानी शिकस्ता-लेखनपद्धतीवरून सुचली अशी सरळ वस्तुस्थिति दिसते. सदर मोडी लिपी हेमाडपंतानें लंकेहून आणली असें म्हटलें जातें. पण लंकेंतील सिंहली लिपीच्या वळणाचा व मोडीचा अर्थाअर्थी संबंध आढळत नाहीं. यादवराज्य रामेश्वरापर्यंत होतें. पण मोडी लिपी व सिंहली लिपी यांचा समन्वय लागत नाहीं. सिंहली लिपीला आज पण कुठलें मोडी वळण आहे असें दिसत नाहीं.

याशिवाय मोडी लिपींतील अक्षरें, तामीळ, तेलगु, कानडी, सिंहली लिपींतील न घेतां प्रत्येक अक्षर शुद्ध देवनागरी अक्षरें मोडूनच तयार करण्यांत आलें आहे. देवनागरी अक्षर लिहितांना अक्षर तोडून लिहावें लागतें व दर वेळीं थांबावें लागतें. पण याच लिपीला मोडी वळण दिलें कीं तीच लिपी वेगवती होते. मोडी भाषेचें आजचें डौलदार स्वरूप बनायला मात्र सातशें वर्षांची परंपरा त्यापाठीमागें आहे.








सनदशीर लोकशाहीच्या मर्यादा : श्री. कृ. ना. फडके

# ब्रिटिश गियानामधील पेंचप्रसंग

एकोणीसशें त्रेपन्नच्या सप्टेंबर व ऑक्टोबर महिन्यांत **ब्रिटिश गियाना** या ब्रिटिश वसाहतीमध्यें ज्या घडामोडी घडल्या, त्यामुळें या लहानग्या देशाकडे साऱ्या जगाचें लक्ष अचानक वेधलें गेलें आहे.

दक्षिण अमेरिकेच्या उत्तरेस असलेल्या या वसाहतीचें क्षेत्रफळ अवघें ८९४८० चौरस मैल असून त्यापैकीं धान्याच्या व उसाच्या लागवडीखालीं असलेल्या समुद्रकांठच्या सुमारें १० मैल रुंदीच्या पट्टीचें क्षेत्रफळ अवघें ४४७४ चौरस मैल आहे. भूपृष्ठाच्या उत्तरेकडील, पूर्वेकडील व आग्नेयेकडील प्रदेश रोरेमा, इमाटाका व कोटाकू या पर्वतांच्या उंच पठारांनीं व्यापलेला आहे. तेथून समुद्रकिनाऱ्यापर्यंतच्या डोंगराळ उताराच्या ८५ टक्के विभागावर घनदाट अरण्य पसरलेलें आहे. या प्रदेशांत उत्तरवाहिनी व ईशान्यवाहिनी अशा ५ नद्या आहेत. परंतु त्यांचे प्रवाह वाहतुकीस निरुपयोगी आहेत. यापैकीं फारच थोड्या विभागांत तुरळक वस्ती आहे.

गियानामध्यें प्रथम डच व नंतर ब्रिटिश लोकांनीं ज्या व्यापारी वसाहती केल्या त्या नदीकांठीं केल्या. परंतु जेव्हां किनाऱ्यालगतची पट्टी अत्यंत सुपीक व उसाच्या लागवडीस योग्य असल्याचें आढळून आलें तेव्हांपासून म्हणजे १८ व्या शतकाच्या सुरवातीपासून वसाहतवाल्यांनीं आपला मोर्चा त्या पट्टीकडे वळविला. हा प्रदेश समुद्रसपाटीपेक्षांहि कांहींसा सखल असल्यानें त्याच्या संरक्षणासाठीं हॉलंडमधील तटबंधाऱ्याप्रमाणें तटबंदी उभारण्यांत आलेली आहे.

१८ व्या शतकापर्यंत ब्रिटिश गियानांत मुख्यतः कॉफी, कापूस व थोड्या प्रमाणांत तंबाखू हीं पिकें होत. परंतु गेलीं १५० वर्षें तेथें उसाच्या लागवडीची वाढ झपाट्यानें झालेली आहे. या लागवडीसाठीं आफ्रिका खंडांतून गुलामांची आयात फार मोठ्या प्रमाणांवर करण्यांत आली. १८३० पर्यंत त्यांची संख्या १ लक्ष १० हजारावर गेली होती. १८३४ मध्यें गुलामगिरीची पद्धत कायद्यानें बंद करण्यांत आली. तेव्हां मुक्त झालेल्या नीग्रोंपैकीं कित्येकांनीं शेतीचा व्यवसाय पत्करला. तेव्हांपासून उसाच्या लागवडीसाठीं हिंदुस्थानांतून व कांहीं पोर्तुगीज वसाहतींमधून मुदतबंदीच्या पद्धतीवर मजुरांची आयात बरींच वर्षें करण्यांत आली. ह्या कारणांनीं ब्रिटिश गियानांतील लोकवस्तीस, बहुराष्ट्रीय, बहुवंशीय व संमिश्र स्वरूप प्राप्त झालेलें आहे. तरीहि श्वेतवर्णीयांच्या विरोधाच्या बळकट धाग्यामुळें तेथील रहिवाशांत एकप्रकारची नवीन राष्ट्रीय ऐक्याची भावना खोलवर रुजलेली आहे.

ब्रिटिश गियानांतील सध्यांची लोकसंख्या ४ लक्ष ४० हजार असून ती ईस्ट इंडियन ( १ लक्ष ९० हजार ८ शें ८० ), आफ्रिकन ( १ लक्ष ५६ हजार ६१ ), अमेरिंडियन ( १७ हजार ), पोर्तुगीज ( ८ हजार ), इतर युरोपियन ( ४ हजार ), चिनी ( ३५०० ), मिश्र वंशीय ( ४५ हजार ) व ब्रिटिश ( २५०० ) याप्रमाणें विभागलेली आहे.

ब्रिटिश गियानाची अर्थव्यवस्था आजतागायत अविकसित वसाहत देशासारखी, अर्थात् कृषिप्रधान आहे. मात्र ऊस हें तेथील मुख्य पीक असल्यानें तेथें साखरेच्या कारखानदारीची वाढ तेवढी मोठ्या प्रमाणावर झालेली आहे. ऊस सोडल्यास तेथील दुसरें पीक म्हणजे भात. परंतु एकूण अन्नधान्याच्या बाबतींत देश अत्यंत मागासलेला आहे. भातशेती करणाऱ्या खातेदारांची संख्या अवघी तेरा हजार असून त्यांच्या वांट्यास डोंगराळ भागांतील निकृष्ट प्रतीची जमीन आलेली आहे. तांदुळाचें उत्पादन दर एकरीं हिंदुस्थानप्रमाणेंच म्हणजे सुमारें १२॥ – १३ मण पडतें. तेथील अर्थव्यवस्थेवर व राज्ययंत्रावर साखरकारखानदारांची पकड असल्यानें सरकारी तिजोरींतील बराच पैसा संरक्षक बंधाऱ्यांवर व काल्व्यांवर आजवर खर्च होत असे. सरकारी उत्पन्नापैकीं ५८ टक्क्यांवर उत्पन्न अप्रत्यक्ष करांतून येतें व प्राप्तीवरील करांतून सुमारें २५ टक्के येतें.

साखरकारखानदारी संपूर्णपणें मिरासदारी भांडवलाच्या हातीं आहे. १८३४ सालीं उसाच्या ४००

इस्टेटी होत्या. आज त्यांची संख्या फक्त २१ आहे. या २१ पैकीं १२ ब्रुकर ब्रदर्स व मॅकोनेल कंपनीच्या मालकीच्या असून त्या कंपनीचे ११ साखरकारखाने आहेत. ५ पार्कर कंपनीच्या मालकीच्या असून तिचे ३ कारखाने आहेत व ३ इस्टेटी एस. डावसन कंपनीच्या आहेत. कांहीं लहानसहान इस्टेटी ब्रिटिशेतर शेतकऱ्यांच्या असतील पण त्यांची संख्या हाताच्या बोटावर मोजण्याइतकीहि नाहीं. ब्रुकर कंपनीच्या मालकीचीं जहाजें असून हॉटेल्स, मोटार गॅरेजेस्, किनाऱ्यावरील वाहतूक व किरकोळ व्यापार यांतहि ब्रुकर कंपनीचेंच वर्चस्व आहे. म्हणूनच या वसाहतीस 'ब्रुकर्स गियाना' असेंहि संबोधण्यांत येतें. १९५२ सालीं तेथील कारखान्यांतून २ लक्ष टन साखर निर्यात करण्यांत आली. अलीकडे उसाच्या लागवडीचें क्षेत्र वाढविण्याऐवजीं कमी करून कमी क्षेत्रांतून अधिकाधिक नफा उकळण्याची प्रवृत्ति दिसून येते. उसाच्या लागवडीखालीं असलेल्या एकूण क्षेत्रफळापैकीं निम्मी जमीन पडीक असूनहि इतर कोणचेंहि पीक काढण्यास कारखानदारांचा विरोध असतो; कारण त्यामुळें मजुरबाजारांतील पुरवठा कमी होऊन मजुरीचे दर वाढण्याची त्यास भीति वाटते. १९४७ सालीं अवघ्या एका वर्षांत साखरकारखानदारांना एकूण गुंतविलेल्या भांडवलाच्या १० टक्के नफा मिळाला. यावरून तेथील मिरासदारांच्या नफेबाजीची कल्पना करतां येईल. साखर–धंद्याची चौकशी करण्यासाठीं १९४९ सालीं नेमलेल्या वेन–कमिशननें सादर केलेल्या अहवालांत उसाच्या शेतीवर राबणाऱ्या शेतमजुरांच्या व कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांच्या परिस्थितीवर विदारक प्रकाश टाकलेला आहे. कामगारांसंबंधीं कोणचीहि सामाजिक जबाबदारी न पत्करतां, ब्रिटिश वसाहतखात्यावर अधिकाधिक दाब आणून जास्तींत जास्त सवलती मिळविण्यांत तेथील कारखानदार गर्क असतात, असा स्पष्ट अभिप्राय या कमिशननें व्यक्त केला आहे. शेती अगर कारखाने ह्यामध्यें यांत्रिक वा आधुनिक पद्धतीचा अवलंब करण्यांत आलेला नाहीं. कारण यंत्रापेक्षां मजुराकडून काम करून घेणें अधिक स्वस्तांत पडतें, असा या कारखानदारांचा हिशेब असतो. १९४६ पासून १४ वर्षांखालील मुलांना शेतवाड्यावर कामास ठेवण्यास बंदी करण्यांत आली. परंतु तो कायदाहि धाब्यावर बसविण्यांत येतो. कामगारांना दिवसाकाठीं १२ तास घराबाहेर घालवावे लागतात, शेतवाड्यावर पिण्याच्या पाण्याची तरतूद देखील पुरेशी नसते व स्वच्छतेच्या सोयीदेखील समाधानकारक नसतात असा अभिप्राय या कमिशननें व्यक्त केला आहे.

शेतवाडीवर अंगावर काम करणाऱ्या मजुरांना दररोज ८ शिलिंग ६ पेन्स मजुरी पडते पण त्यांना आठवड्यांत सरासरी ३ दिवस काम मिळतें. १९४८ सालीं शेतमजुरांपैकीं पुरुष व स्त्री कामगारांचें दरसाल उत्पन्न अनुक्रमें सुमारें ८२० रुपये व ४६० रुपये पडलेलें आढळलें. त्यानंतर कामगारांच्या महागाईभत्त्यांत थोडी वाढ झालेली असली तरी १९४८ पासून राहणीचा खर्च दुपटीनें वाढलेला आहे. कामगारांना राहण्यासाठीं बांधलेल्या पडळींपैकीं एक तृतीयांश पडळी मनुष्यवस्तीस निकामी असलेल्या व राहिलेल्या पडळी गळक्या व नादुरुस्त असलेल्या कमिशनला आढळून आल्या. आरोग्यविषयक सोयी, बेकारभत्ता वगैरे तर दूरच पण कारखान्यांतील स्थितीवर सरकारच्या देखरेखीचीहि तजवीज, ४९ सालपर्यंत नव्हती. तेव्हां निदान फॅक्टरी–इन्स्पेक्शनची सोय कायद्यानें करण्यांत यावी अशी शिफारस त्या कमिशननें केली होती. उसाची लागवड व साखरकारखाने यांत काम करणाऱ्या कामगारांची संख्या २८ हजार असून यांत स्त्री-कामगारांची संख्या ६ हजार आहे. मॅंगनीज व सोनें यांच्या खाणींत काम करणाऱ्यांची संख्या हजार–दोनहजाराच्या घरांत असेल. याशिवाय तेथ बॉक्साईटच्या खाणी असून त्यांत ३ हजारांवर कामगार आहेत. बॉक्साईट व मॅंगनीजच्या खाणींत अमेरिकन भांडवलदारांचे हितसंबंध बरेच गुंतलेले आहेत. खाणीच्या नजीकच्या विभागांत वर्णविद्वेष व वर्णविभागणीचें तत्त्व करडेपणानें पाळण्यांत येतें. तें इतकें कीं बॉक्साईटच्या खाणकंपनीमध्यें डॉ. जगन् यांनीं नोकरीसाठीं अर्ज केला असतां त्यांना मॅकेंझी शहराच्या एका विभागांत व त्यांच्या गौरवर्णीय पत्नीस दुसऱ्या विभागांत राहावें लागेल असें त्यास आढळून आलें.

ब्रिटिशांनीं १८१४ सालीं या वसाहतीचा ताबा हॉलंडकडून घेतला तेव्हांपासून १९२८ पर्यंत या वसाहतीमध्यें लोकशाहीचा मागमूसच नव्हता असें म्हणावयास हरकत नाहीं. १९२८ सालच्या सुधारणांनीं








तेथें प्रथम कायदेमंडळाची व गव्हर्नरच्या कार्यकारी मंडळाची स्थापना करण्यांत आली. १९४३ च्या कायद्यानें कायदेमंडळांतील लोकनियुक्त सभासदांच्या संख्येंत थोडी वाढ करण्यांत आली इतकेंच. परंतु या दोन्ही सुधारणांनीं हिंदुस्थानांतील मॉंटेग्यु-चेम्सफर्ड-सुधारणांइतकीहि मजल गांठली नव्हती.

दुसऱ्या महायुद्धांत ब्रिटिश गियानामधील शेंकडों सैनिकांचा संबंध युरोप व अमेरिका या देशांशीं आला, व युद्धोत्तर काळांत वसाहत-देशांत झालेल्या स्वातंत्र्य-संग्रामांच्या उठावांचा परिणामहि येथील जनतेवर झाल्यावांचून राहिला नाहीं. तेव्हां तेथील जनतेच्या राजकीय आकांक्षा फार काळ डावलणें शक्य होणार नाहीं हें जाणून त्यावेळच्या ब्रिटनमधील मजूरसरकारनें तेथील राज्यघटनेचा फेरविचार करण्यासाठीं वॅडिंग्टन-कमिशनची नेमणूक केली. वॅडिंग्टन कमिशनच्या शिफारशीनुसार करण्यांत आलेली घटना १९५३ च्या सुरुवातीस अंमलांत आली. या घटनेनुसार वरिष्ठ व कनिष्ठ कायदेमंडळांची स्थापना करण्यांत आली. कनिष्ठ सभागृहांत अथवा हाऊस ऑफ ॲसेंब्लीमध्यें ३ सरकारनियुक्त मंत्र्यांसुद्धां एकूण २४ सभासद असतात. वरिष्ठ सभागृहाच्या ९ सभासदांपैकीं ६ गव्हर्नरनें नियुक्त केलेले व ३ कायदेमंडळांतील बहुसंख्य व अल्पसंख्य पक्षांच्या शिफारसींनुसार दोनास एक या प्रमाणांत गव्हर्नरनें नियुक्त केलेले असतात. कार्यकारी मंडळाचा अध्यक्ष गव्हर्नर हाच असून त्यांत तेथील सरकारचा सरचिटणीस, अर्थखात्याचा चिटणीस, ॲटर्नी-जनरल व एक गव्हर्नरनियुक्त मंत्री हे सरकारी सभासद व कायदेमंडळाच्या सभासदांमधून गुप्त मतदानानें निवडलेले ६ मंत्री यांचा समावेश असतो. त्यापैकीं सरकारी मंत्र्याकडे मुलकी-नोकर-खातें, परराष्ट्र व राष्ट्रकुटुंबखातें, संरक्षण व पोलीस खातें, माहिती खातें, कायदा व सुव्यवस्था खातें व अर्थखातें इतकीं खातीं सोंपविण्यांत आलीं आहेत. वॅडिंग्टन-कमिशनच्या मतें हीं खातीं लोकनियुक्त मंत्र्याकडे सोंपविण्याइतकी परिस्थिति अद्याप आलेली नाहीं. लोकनियुक्त मंत्र्यांकडे आरोग्य, मजूर, शिक्षण, समाज-कल्याण, सार्वजनिक बांधकाम, वाहतूक, शेती व उद्योगधंदे हीं खातीं सोपविण्यांत आलेलीं असतात. प्रत्येक मंत्री व्यक्तिशः गव्हर्नरला जबाबदार असतो, पण सामूहिक जबाबदारीचा प्रारंभ म्हणून लोकनियुक्त मंत्र्यांपैकीं एकाची पहिला मंत्री म्हणून गव्हर्नर निवड करतो. १९३५ च्या हिंदी घटनाकायद्यांत गव्हर्नर-जनरलकडे जे खास अधिकार होते ते सर्व या नव्या 'लोकशाही' घटनेखालीं तेथील गव्हर्नरच्या हातीं अबाधित ठेवण्यांत आले आहेत. कनिष्ठ सभागृहापुढें आलेलें व त्यानें मान्य केलेलें कोणतेंहि अर्थविषयक विधेयक वरिष्ठ कायदेमंडळाला ३ महिनेपर्यंत स्थगित करतां येतें व इतर विधेयकें एक वर्षपर्यंत स्थगित करतां येतात. या नव्या घटनेंत अत्यंत महत्त्वाची अशी सुधारणा करण्यांत आली होती ती म्हणजे प्रौढ मतदानाचा हक्क. ज्या घटनेखालीं ऑक्टोबरमधील पेंचप्रसंग निर्माण झाला तिचें 'लोकशाही' स्वरूप हें असें आहे.

या नव्या घटनेनुसार ब्रिटिश गियानांतील कायदेमंडळाच्या निवडणुका १९५३ च्या एप्रिल महिन्यांत झाल्या. पुरोगामी लोकपक्ष (पी.पी.पी.), राष्ट्रीय लोकशाही पक्ष, संयुक्त गियाना पक्ष व संयुक्त शेतकरी–कामगार–पक्ष अशा चार पक्षांनीं या निवडणुकांत भाग घेतला होता. त्यापैकीं संयुक्त शे. का. पक्ष हा तेथील खातेदारांचा पक्ष होता. राष्ट्रीय लोकशाही पक्ष मुख्यतः मोठे व्यापारी व व्यवसायी वर्गांचा होता व संयुक्त गियाना पक्ष हा बड्या भांडवलदारांचा पक्ष होता. शेवटच्या दोन पक्षांचें आतां एकीकरण झालेलें आहे. त्या पक्षांच्या बलाबलासंबंधीं 'मँचेस्टर गार्डियन'च्या वार्ताहराच्या अभिप्रायावरून कल्पना येऊं शकते. त्याच्या मतें ब्रिटिश गियानांत पक्ष या संज्ञेस पात्र असणारा असा 'पुरोगामी लोकपक्ष' हा एकच पक्ष होता. या निवडणुकींत पुरोगामी लोकपक्षानें २४ पैकीं १८ जागा जिंकल्या व झालेल्या मतदानांपैकीं ५१ टक्के मतें या पक्षास मिळालीं. नव्या मंत्रिमंडळामध्यें ह्या पक्षाचे चार मंत्री असून डॉ. चेड्डी जगन् ह्यांची पहिले मंत्री म्हणून नेमणूक करण्यांत आली. डॉ. बर्नहॅम डॉ. लक्ष्मणसिंग व मि. किंग हे इतर मंत्री होते.

निवडणुकींत भाग घेतलेल्या पक्षांपैकीं पुरोगामी लोकपक्षाचाच सर्वसामान्य जनतेला आकर्षण वाटेल असा स्पष्ट कार्यक्रम होता. इतर पक्षांना कार्यक्रम होता असें म्हणण्यापेक्षां पुरोगामी लोकपक्षाला विरोध हाच त्यांचा









अनुक्रमणिका

कार्यक्रम होता. पुरोगामी लोकपक्षाचा कार्यक्रम सामाजिक सुरक्षिततेची योजना, मोफत वैद्यकीय उपचाराची प्रारंभिक योजना, सरकार-नियंत्रित निधर्मी शिक्षण, पाण्याच्या निचऱ्याच्या व कालव्यांच्या योजना, या योजनांनीं जी नवी जमीन लागवडीलायक होईल तिची छोट्या खातेदारांत विभागणी व ऊसवाड्यांचें राष्ट्रीकरण इत्यादि प्रमुख बाबी होत्या. या कार्यक्रमांत शेवटच्या बाबीचा अंतर्भाव करण्याचें मुख्य कारण म्हणजे साखरकंपन्यांच्या द्वारां दरसाल वसाहतीबाहेर जाणारा लाखो पौंडांचा ओघ हेंच होय. ऊसवाड्यांचें राष्ट्रीकरण केल्यावांचून समाजकल्याणाच्या कोणत्याहि योजनेला लागणारा पैसा उभारणें तेथील सरकारला शक्य होणार नाहीं असा अभिप्राय कित्येक निःपक्षपाती निरीक्षकांनीं व्यक्त केला आहे. 'न्यू स्टेट्स्मन अँड नेशन' या पत्रानें (१७–१०–५३) म्हटल्याप्रमाणें राष्ट्रीकरणाची बाब वगळल्यास पुरोगामी लोकपक्षाच्या कार्यक्रमांत अशी एकहि बाब नव्हती कीं, जिला मवाळांतील मवाळ उदारमतवाद्यानेंहि आक्षेप घ्यावा!

राष्ट्रीकरणाचा कार्यक्रम ८ वर्षेंपर्यंत स्थगित करण्याचें ह्या पक्षानें ठरविलें होतें. उलट दरम्यानच्या काळांत खाजगी उद्योगधंद्यांची वाढ करावी असेंच मंत्रिमंडळाचें धोरण होतें. पुरोगामी लोकपक्ष हा कम्युनिस्ट पक्ष असल्याची हांकाटी तेथील बड्या भांडवलदारांनीं, त्यांचा पाठपुरावा करणाऱ्या अमेरिकन बड्या भांडवलदारांनीं व अमेरिकन परराष्ट्रखात्यानें निवडणुकीपासूनच चालविली होती. तेव्हां या पक्षाच्या स्वरूपासंबंधानें निवडणुकीच्या वेळीं 'मँचेस्टर गार्डियन' नें व्यक्त केलेला अभिप्राय येथें उद्धृत करणें योग्य होईल. या पत्राच्या वार्ताहराच्या मतें "कॅरिबियन वसाहतीमधील इतर कोणत्याहि डाव्या पक्षापेक्षां या पक्षाला अधिक विचारी व व्यासंगी नेते लाभलेले आहेत. निर्विवाद बहुमत मिळालें तरी ते त्याचा दुरुपयोग करणार नाहींत असा विश्वास बाळगण्यास हरकत नाहीं"

अवघ्या पांच महिन्यांच्या अमदानींत या पक्षाच्या प्रधानमंडळानें केलेलें कार्य पाहिलें तर त्यावरून प्रधानमंडळाच्या कार्याच्या दिशेची सहज कल्पना येईल. नव्या प्रधानमंडळानें दुय्यम शाळांतील विद्यार्थ्यांसाठीं अनेक शिष्यवृत्त्या चालू केल्या, ज्या कायद्याखालीं समाजवादी ब्रिटिश लेखकांच्याहि लिखाणास बंदी करण्यांत येत असे तो कायदा रद्द केला, वसाहतींत येण्याजाण्यावरील बंदी उठविली, घरकामी नोकरांच्या स्थितीची चौकशी करण्यासाठीं कमिशन नेमलें व बहुसंख्याक कामगारांचा ज्या कामगारसंघास पाठिंबा असेल त्या संघास मान्यता मिळण्याचा कायदा कायदेमंडळापुढें आणला. लोकनियुक्त मंत्रिमंडळानें हातीं घेतलेल्या या कार्यास सरकारनियुक्त मंत्र्यांकडून पावलोपावलीं विरोध करण्यांत येत होता. आणि यांतूनच ब्रिटिश गियानांतील पेंचप्रसंग उद्भवला.

१९५३ च्या ऑगस्ट महिन्यांत उसाच्या शेतीवाडीवरील कामगारांनीं संप पुकारला. कामगारांच्या बहुतेक सर्व मागण्या मामुली सुधारणांच्या स्वरूपाच्या होत्या. मुख्य लढा यूनियनच्या मान्यतेसंबंधींचा होता. साखरकारखानदारांनीं 'Man-power Citizens' Association' नांवाची कंपनीयुनियन स्थापन केलेली होती व तिला कारखानदारांनीं मान्यता दिलेली होती. बहुसंख्य कामगारांचा पाठिंबा मात्र गियाना इंडस्ट्रियल वर्कर्स युनियन या संघाला होता. या संघाचे अध्यक्ष माजी आरोग्य व बांधकाम-मंत्री श्री. लछमनसिंग हे होते. "हा संघ मॅन पॉवर सिटिझन्स ॲसोसिएशन मध्यें विलीन होईल तरच आम्ही त्याला मान्यता देऊं" असा मालकांचा हट्ट होता. हा संप १०० टक्के यशस्वी झाला व ऐन हंगामांत जवळ जवळ सर्व शेतवाड्यांवरील काम बंद पडलें. परंतु पुढें कागारांच्या मागण्यांच्या बाबतींत मजूरमंत्री श्री. किंग यांनीं मध्यस्थी करावी असें ठरवून २३ सप्टेंबर १९५३ ला हा संप मागें घेण्यांत आला. संपाच्या काळांत अत्याचाराचे प्रकार कोठेंहि घडले नव्हते. ब्रिटिश गियानाची घटना रद्द करण्यामागें, लोकनियुक्त मंत्र्यांना अधिकारावरून दूर करण्यामागें व ब्रिटिश गियानांत लष्कर उतरविण्यामागें हा संप व त्या संपाबाबत लोकनियुक्त मंत्र्यांनीं अवलंबिलेलें धोरण हीच वास्तविक कारणें होतीं. ब्रिटिश गियानाकडे लष्कर पाठविण्यांत येत असल्याच्या बातमीची परिस्फुटता होईपर्यंत ब्रिटिश गियानांत कोठेंहि शांतताभंग झाल्याची बातमी नव्हती. आणि त्याबद्दल खुद्द गव्हर्नर मि. सॅव्हेज यानें मंत्रिमंडळाकडे एका शब्दानेंहि तक्रार केलेली नव्हती. ता. ८ ऑक्टोबर रोजीं ब्रिटिश गियानांत ब्रिटिश सैन्य उतर-








विण्यांत आलें. जॉर्ज टाउनचे डेप्युटी पोलीस कमिशनर यांनीं ' डेली मेल ' या ब्रिटिश वृत्तपत्राला, त्यापूर्वी दोनच दिवस दिलेल्या मुलाखतींत ब्रिटिश गियानांत सर्वत्र शांतता नांदत असल्याची ग्वाही दिली होती. जॉर्ज टाउनच्या रस्त्यांवरून प्रत्यक्ष रणगाडे धडाडे-पर्यंत तेथें अशांतता माजली आहे याचा मागमूसहि तेथील ब्रिटिश रहिवाशांनाहि नव्हता असें त्यांपैकीं कांहींनीं ब्रिटिश पत्रांना पाठविलेल्या पत्रांवरून दिसून येतें. ता. ९ ऑक्टोबर रोजीं ब्रिटिश वसाहतखात्यानें " कम्युनिस्टांनीं सरकार उलथून पाडूं नये म्हणून व सार्वजनिक शांततेवर व अर्थव्यवस्थेवर अरिष्ट कोसळूं नये म्हणून " ब्रिटिश गियानांतील घटना रद्द करण्यांत आल्याचें श्वेतपत्रिका काढून जाहीर केलें. या श्वेतपत्रिकेंत करण्यांत आलेले कांहीं आरोप मासलेवाईक आहेत. शिक्षण निधर्मी करण्यांत मंत्रिमंडळाचा उद्देश मुलांच्या डोक्यांत कम्युनिस्ट तत्त्वें भरण्याचा होता, मंत्र्यांनीं शांततासमितीची स्थानिक शाखा प्रस्थापित केली होती, मंत्र्यांपैकीं कांहींचा आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट संघटनांशीं अर्थात् जागतिक शांतता-परिषदेशीं व जागतिक ट्रेड युनियन फेडरेशनशीं संबंध होता हे ते आरोप होत. या श्वेतपत्रिकेंत मंत्र्यांनीं घटना उलथून पाडण्याचा कट केल्याचाहि आरोप करण्यांत आला होता. श्वेतपत्रिका प्रसिद्ध झाल्यानंतर जॉर्ज टाउनमधील ' लंडन टाईम्स'च्या बातमीदारानें तेथून पाठविलेल्या पत्रांत ब्रिटिश गियानांत अशा कटाचा कोणासहि गंध नव्हता, असें स्पष्टपणें नमूद केलें होतें. तो वार्ताहर पुढें म्हणतो: " हें लष्करी सामर्थ्याचें प्रदर्शन आगामी कटामुळें समर्थनीय होतें असा पुरावा जर पुढें आला नाहीं तर तेथील लोकमत सरकारविरोधी होईल. " या श्वेतपत्रिकेबाबत ' मँचेस्टर गार्डियन ', ' डेली हेरल्ड ', ' डेली मिरर ' इत्यादि ब्रिटिश पत्रांनीं केलेल्या टीकेंत कटाच्या आरोपाबाबत सरकारची बाजू अत्यंत कमकुवत असल्याचें मत व्यक्त केलें होतें. ता. ९ ऑक्टोबरच्या ' मँचेस्टर गॉर्डियन'च्या अंकांतील श्वेतपत्रिकेवरील संपादकीयांत या श्वेतपत्रिकेवरून अथवा वसाहतखात्याच्या प्रवक्त्यानें केलेल्या भाष्यावरून तेथें लष्कर कां पाठवावें लागलें याचा स्पष्ट व पुरेसा खुलासा होत नाहीं, असें मत व्यक्त केलें होतें. ब्रिटिश गियानांत लष्कर उतरविण्यापूर्वी दोन दिवसपर्यंत वेस्ट इंडीजमधील हिंद सरकारचे प्रतिनिधी श्री. ए. एन्. सहाय हे जॉर्ज टाउनमध्यें होते. ता. ९ रोजी तें मॉरिशसला जाण्यासाठीं लंडन येथें उतरले. तेथें त्यांनीं पत्रकारांना दिलेल्या मुलाखतींत, आपल्या ब्रिटिश गियानांतील मुक्कामांत आपल्याला तेथें कोठेंहि अशांतता दिसून आली नाहीं असा निर्वाळा देऊन पुरोगामी लोकपक्षीय मंत्री हे जबाबदार लोकशाहीवादी असल्याबद्दल आपला संपूर्ण विश्वास आहे, असाहि निर्वाळा दिला होता.

वस्तुस्थिति अशी आहे कीं ऊसकामगारांच्या संपापासून तेथील गव्हर्नर, ब्रिटिश वसाहतखातें व अमेरिकन परराष्ट्रखातें यांच्यामध्यें तेथील घटना रद्द करण्याचा व तेथील लोकपक्षीय मंत्र्यांची उचलबांगडी करण्याचा कट रचला जात होता. कम्युनिस्ट कटाची कपोलकल्पित कथा, हा कट संपूर्णतया शिजल्यानंतर, रचण्यांत आलेली होती. तेथें लष्कर पाठविण्यांत आलें तें घटना रद्द केल्यानंतर होणारा लोकक्षोभ दडपून टाकण्यासाठींच पाठविण्यांत आलें होतें. श्वेतपत्रिकेचें समर्थन करतांना वसाहतमंत्री लॉर्ड लिट्लटन यांनीं पेंचप्रसंगामागील जें धोरण स्पष्ट शब्दांत पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांपुढें मांडलेलें होतें त्यालाच खरें महत्त्व आहे. ब्रिटिश राष्ट्रकुलांत कम्युनिस्ट वचस्वाखालीं स्थापन झालेलें सरकार ब्रिटिश सरकार कधींच सहन करणार नाहीं हेंच तें धोरण होय.

सारांश, ब्रि. गियानांमधील घटनांच्या समर्थनार्थ ' स्वतंत्र लोकशाही'च्या पुरस्कर्त्यांनीं एक नवीन घटना-विषयक सिद्धान्त जगापुढें मांडलेला आहे. बड्या भांडवलदारांच्या हितसंबंधास ज्यांचा विरोध असेल वा ज्यांचा विरोध होण्याचा संभव असेल ते सारे कम्युनिस्ट, अशा कोणाच्याहि वा कोणा पक्षाच्याहि हातीं शांततेच्या व सनदशीर मार्गानेंहि सत्ता गेल्यास त्यांतून भविष्यकालीं हुकूमशाही प्रस्थापित होणार असें गृहीत धरून त्यांच्या हातून लष्करी बळावर सत्ता हिसकावून घेण्याचा हक्क साम्राज्यशाही राष्ट्रांना आहे व असावयास पाहिजे, आणि हा हक्क लोकशाही हक्क असून तो संपूर्णपणें सनदशीर मानण्यांत आला पाहिजे हाच तो सिद्धान्त होय! सत्ताधारी वर्गाच्या दृष्टीनें सनदशीर लोकशाहीच्या मर्यादा कोणत्या याचें आकलन होण्यास हा सिद्धान्त निःसंशय उपकारक होईल.










प्रा. अच्युत केशव भागवत

# कथाकार विल्यम् समरसेट् मॉम्

" The only valid and sensible reason I know for adopting the profession of literature is that you have so strong and urgent desire to write that you cannot resist it. He (a writer under this compulsion) may succeed or he may fail but in any case he will have enjoyed the intense pleasure of creation and fulfilled himself. He will lead a life of inexhaustible interest and enjoy, as few can in this world of today, the inestimable pleasure of freedom " — ' The Writer's Point of View '.

[ नॅशनल् बुक् लीग पुढें समरसेट् मॉम यांचें झालेलें भाषण ( १९५१ ) ] पान २३.

**इंग्रजी वाङ्मयाचा पितामह**

'केक्स् अँड एल्' ह्या कादंबरींतील एड्वर्ड ड्रूफील्ड ह्या कादंबरीकारपात्राबद्दल मॉम्नीं आपल्या नेहमींच्या उपहासगर्भ, व्याजोक्तिपूर्ण शैलींत पुढील उद्गार काढले आहेत :

" मला वाटतें दीर्घायुष्य ही असामान्यत्वाची कसोटी असली तर एड्वर्ड ड्रूफील्ड तींत इतर कोणाहिपेक्षां अधिक यशस्वितेनें उत्तीर्ण झाला होता. तो साठ वर्षांचा तरणाबांड होता तेव्हां वाङ्मयीन जग त्याला थोड्याशा आदरानें वागवीत असे (त्यांतहि जे विशेष ' सुसंस्कृत ' होते ते त्याच्याकडे लक्ष न देतांच पुढें जात!); अधिक जाणते त्याची स्तुति करीत पण ती आपली बेतानेंच; तरुण पिढींतल्या लोकांकडून त्याची टिंगलच होई. त्याच्यांत चमक आहे हें लोकांना मान्य होतें. परंतु इंग्रजी वाङ्मयाचें तो एक वैभवस्थान आहे हें कोणालाच माहीत नव्हतें. त्यानें आपला सत्तरावा वाढदिवस साजरा केला तेव्हां पूर्वेकडील सागरांवर आगामी तुफानाच्या चाहुलीनें जशा लहानशा लाटा उद्भवतात तशी एक लाट वाङ्मयीन जगतांत उद्भवली आणि मग लोकांना कळून आलें कीं एका मोठ्या कादंबरीकाराचें आपल्यांत इतकें दिवस वास्तव्य होतें, पण आपल्याला त्याची वार्ताहि नव्हती! ड्रूफील्डच्या पुस्तकांवर लोक तुटून पडले, सर्व वाचनालयांत त्याच्या पुस्तकांना मागणी सुरू झाली आणि ब्लूम्सबरी, चेल्सिआ येथील शेंकडो लेखक त्याच्याबद्दल रसग्रहणात्मक लेख, परीक्षणें, लहानमोठे अभिप्राय लिहून त्याचें गुणवर्णन करूं लागले. त्याचें वाङ्मय संपूर्ण आवृत्तींत, निवडक आवृत्तींत एका शिलिंगाला, पांच शिलिंगाला किंवा एका गिनीला मिळणाऱ्या आवृत्तींत छापलें गेलें. त्याची शैली नांवाजली गेली, तत्त्वज्ञानाची छाननी केली गेली आणि तंत्र विच्छेदिलें गेलें. पंचाहत्तराव्या वर्षी ड्रूफील्डला असामान्यत्व आहे ह्याबद्दल सर्वांचें एकमत झालें. ऐशीव्या वर्षी तो इंग्रजी वाङ्मयाचा पितामह ठरला; आणि मृत्यूपर्यंत त्यानें हीच जागा विभूषित केली. " आज स्वतः **मॉमच्या ८० व्या वाढदिवसाच्या** वेळीं त्यांच्या वाङ्मयीन कीर्तीचा विचार करीत असतां हा उतारा आत्मनिवेदनपरच आहे कीं काय असें वाटतें. ड्रूफील्डप्रमाणें मॉम्ना सुद्धां इंग्रजी वाङ्मयाचे पितामह म्हणून आज मान मिळूं लागला आहे. तो अर्थात् दीर्घायुष्यामुळें

---

सुप्रसिद्ध आंग्ल साहित्यिक **समरसेट मॉम** ( Somerset Maugham ) यांच्या वयाला नुकतींच गेल्या २५ जानेवारी १९५४ ला ८० वर्षे पुरीं झालीं. त्या निमित्तानें या अंकांत मॉमच्या वाङ्मयगुणांचें समीक्षण करणारा प्रा. अ. के. भागवत यांचा प्रस्तुत लेख, त्यानंतर प्रा. अ. के. भागवत यांनींच अनुवाद केलेली मॉमची एक लघुकथा आणि त्यानंतर प्रा. ग. प्र. प्रधान यांनीं मॉमच्या ' Penelope ' या नाटकाचें केलेलें समीक्षण हीं दिलीं आहेत. मॉमचा हा परिचय वाचकांस समयोचित, रोचक आणि उद्बोधक वाटेल असा विश्वास वाटतो. – का. सं.

नव्हे तर त्यांच्या अभिजात वाङ्मयगुणांमुळें.

मॉम् यांच्या वाङ्मयीन यशांत आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे. विसाव्या शतकांतील इंग्रजी वाङ्मयाचा विचार करतांना वाचकवर्गाच्या अभिरुचीच्या, आवडीनिवडीच्या प्रती ठरून गेलेल्या दिसतात. कादंबरीसारख्या वाङ्मयप्रकाराचा विचार करतांना कादंबरीच्या तंत्र अगर विषयाविष्काराच्या दृष्टीनें तींत ज्यांनी भर टाकली अशा हेन्री जम्स, व्हर्जीनिया वूल्फ, आल्डस् हक्स्ले, जेम्स जॉईस् ह्यांचा गौरवानें उल्लेख केला जातो. (अलीकडे ई० एम्० फॉर्स्टर यांच्या कादंबऱ्यांनाहि हें स्थान देण्यांत आलें आहे) परंतु सर्वसाधारण वाचक ह्या लेखकांच्या कादंबऱ्या किती वाचतात ह्याचा विचार केला तर असें दिसून येईल कीं तशी लोकप्रियता ह्या कादंबऱ्यांना कधींच लाभलेली नाहीं! ह्यामुळें ह्या कादंबऱ्या वाचणाऱ्या उच्चभ्रू वाचकांचा एक वर्ग आणि ह्या कादंबऱ्यांना दुरून नमस्कार करून प्रत्यक्ष रहस्यकथा किंवा पी० जी० वूडहौसच्या कथा वाचणारा सामान्य वाचकांचा दुसरा वर्ग—अशीं हीं एकमेकांच्या अभिरुचींत, आवडीनिवडींत फारसें साम्य नसलेलीं वाचकांचीं दोन जगें कल्पावीं लागतात. कांहीं कांहीं वेळेस मात्र ह्या दोन्ही जगांच्या परिसीमेवर उभें राहून दोन्ही दर्जाच्या वाचकांना सारखीच मोहिनी घालणारा एखादा सामर्थ्यशाली लेखक निर्माण होतो आणि दोन्हीं जगांतील वाचक त्याला सारखेंच अर्घ्यप्रदान करतात. असें हें भाग्य लाभलेल्या सामर्थ्यशाली लेखकांत समरसेट् मॉम् यांची गणना करावी लागेल. मॉम् यांच्या यशानें अशा तऱ्हेनें इंग्लंडमधील 'वर्गविग्रह' तर ओलांडलाच आहे; पण भौगोलिक दृष्ट्याहि अमेरिकेचें नवें जग आक्रमण केलें आहे. फ्रान्समध्यें त्यांना बहुमानाचें स्थान देण्यांत आलें असून 'इंग्रजी मोपासां' म्हणून त्यांचा सार्थ गौरव करण्यांत आला आहे. मॉम यांच्या वाङ्यीन यशाचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांची लेखणी कादंबरी लघुकथा ह्या प्रांताप्रमाणें नाट्यक्षेत्रांतहि आपली चमक दाखविते. त्यांचीं आत्मनिवेदनपर, निबंधवजा पुस्तकें, वाङ्मयीन टीका व मतें आज अत्यंत आदरानें वाचलीं जातात व त्यांतील उतारे आधारासाठीं उद्धृत केले जातात.

### कादंबरीकाराचें कार्य

जन्मानें मॉम् हे गॉल्सवर्दी, वेल्स आणि अर्नोल्ड बेनेट् ह्या विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांतील कादंबरीकारांचे समकालीन आहेत; परंतु ह्या तिन्ही कादंबरीकारांच्या कलाकृतींचा आज विचार केला तर कांहीं सन्माननीय अपवाद सोडल्यास ह्या तिन्ही कादंबरीकारांच्या कादंबऱ्या आज गतकालीन झाल्या आहेत, त्यांतील ताजेपणा नाहींसा झाला आहे. मॉम्नीं ह्यांच्याबरोबरच लिहिण्यास सुरवात केली; परंतु वेल्स-गॉल्सवर्दीप्रमाणें त्यांनीं प्रचलित राजकीय, सामाजिक वा समाजशास्त्रीय प्रवाह आपल्या कादंबऱ्यांत आणले नाहींत. पुढें गॉल्सवर्दी, बेनेट्, वेल्स ह्यांच्या विरुद्ध व्हर्जिनिआ वूल्फसारख्यांनीं मोहीम उभारली आणि कथेपेक्षां स्वभावदर्शनावर, प्रत्यक्ष वास्तव जड प्रसंगांपेक्षां सूक्ष्म मानसिक हेलकावे, तरळ भावच्छटा ह्यांवर कादंबरी भर देऊं लागली. संज्ञाप्रवाहासारख्या अभिनव तंत्राचा उपयोग होऊं लागला. कादंबरींत तंत्रदृष्ट्या अभिनव व आकर्षक भर पडली; पण ह्याबरोबरच उच्चभ्रू व सामान्य वाचक ह्यांमध्यें अनुल्लंघनीय दरी निर्माण होत गेली. मॉम्नीं मात्र १८९७ सालीं लिहिलेल्या "लिझा ऑफ लँम्बेथ" ह्या कादंबरींत जें कथानकप्रधान तंत्र वापरलें तेंच थोड्याफार फरकानें १९४४ सालांतील 'रेझर्स एज्' मध्यें कायम ठेवलें. अर्थात् ह्यांत मानसशास्त्रीय आंदोलनें आलीं नाहींत असें नाहीं; परंतु त्यासाठीं उच्चभ्रू कादंबरीप्रमाणें कथानकाचा बळी दिला नाहीं. १९५१ सालीं नॅशनल बुक लीगपुढें बोलतांना त्यांनीं आपल्या तंत्रकल्पना स्पष्ट केल्या आहेत त्यावरून त्यांची पारंपरिक तंत्रकल्पनांची आवड स्पष्ट होते. वाचकाला ज्यापासून बुद्धिवादी आनंद होतो अशा कादंबरींत कोणते गुण असावेत असा प्रश्न ते विचारतात व उत्तर देतात: "कादंबरीनें एक सुसंगत व संभवनीय अशी गोष्ट सांगितली पाहिजे; तींत विविध विश्वसनीय असे प्रसंग असावेत; पात्रें जिवंत आणि ताजीं, नुकतींच पाहिलेलीं असावींत व नैसर्गिक संभाषण असावें. हें जर कादंबरीकार करूं शकला तर त्यानें सर्व अपेक्षा पुऱ्या केल्या असें म्हणावें लागेल. त्याचें कार्य आनंद देणें आहे; शिकविणें नाहीं." १९५२ सालीं लिहिलेल्या 'व्हॅग्रंट मूड' ह्या पुस्तकांत रहस्यकथांचें समर्थन करतांना मॉम्नीं नव्या उच्चभ्रू कादंबरीची पुढील शब्दांत संभावना केली आहे:








"त्यांना फारशी किंवा कधींकधीं मुळींच गोष्ट सांगायची नसते आणि म्हणून त्यांना वाटतें कीं गोष्ट हा कादंबरीचा उपेक्षणीय भाग आहे! आणि म्हणून ह्या कादंबऱ्यांनीं ज्या एका गोष्टीचें सर्व मानवजातीला जबरदस्त आकर्षण आहे, तीच काढून टाकली आहे! मग लोक रहस्यकथा अधिक वाचतात अशी तक्रार कां?" रहस्यकथा ह्या गोष्ट अधिक कौशल्यानें सांगतात म्हणून त्यांनीं उच्चभ्रू कादंबरीवर मात केली आहे हें अर्थात् अर्धसत्य आहे. परंतु सध्यां आपण केवळ मॉम्च्या कथानकप्रधानतेचाच विचार करूं.

कथानक हें अशा तऱ्हेनें प्रधान अंग मानलें तरी कादंबरींत केवळ कथाच असते असें मात्र मॉमना वाटत नाहीं. "केवळ कथा सांगणारा असा प्राणीच कोणी नसतो. कादंबरीकार हा आपल्या पूर्वग्रहांच्या अधीन असतो. त्याचे विषय, कल्पिलेलीं पात्रें, त्याचा त्यांविषयीं दृष्टिकोण ह्या सर्व गोष्टी ह्या पूर्वग्रहा-(bias)-मुळें ठरतात. तो जें कांहीं लिहितो तें त्याच्या व्यक्तित्वाचा आविष्कार असतें; त्याच्या आंतरिक प्रवृत्ती, भावना, अनुभव व मतें ह्यांचें मूर्त स्वरूप कादंबरींत दिसतें. त्यानें कितीहि वस्तुनिष्ठ राहाण्याचा प्रयत्न केला तरी तो आपल्या आवडीनिवडींचा गुलाम असतो; कितीहि निःपक्षपातीपणाचा आव आणला तरी तो कोठली तरी बाजू घेतोच!" मॉम् ह्यांचे हे पूर्वग्रह कोणते? आयुष्यांतल्या कोणत्या अनुभवांचा आविष्कार त्यांनीं आपल्या वाङ्मयांत केला? त्यांच्या स्वतःच्या व्यक्तित्वाचा कोणता ठसा त्यांच्या वाङ्मयांत उमटलेला दिसतो? — ह्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांच्या कथा-कादंबरी-वाङ्मयांत शोधलीं पाहिजेत. तरच त्यांच्या असामान्य लोकप्रियतेचें प्रधान कारण सहज लक्षांत येईल.

बहुतेक सर्व कादंबरीकारांप्रमाणें मॉमनी आपल्या जीवितांतले प्रमुख प्रसंग, विचार, भावना, प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें कलात्मक दृष्ट्या 'ऑफ् ह्यूमन् बॉंडेज्' (१९१५) ह्या आत्मचरित्रपर कादंबरींत ग्रथित केले आहेत. ह्या कादंबरींतील फिलीप कॅरी ही मॉम् यांची वाङ्मयीन प्रतिमा आहे. ह्या प्रदीर्घ, वास्तववादी, मोपासां किंवा सॅम्युअल् बट्लर यांच्या लेखनपद्धतीची आठवण करून देणाऱ्या कादंबरींत मॉम्नीं कादंबरी-लेखनाचा उच्चांक गांठलेला दिसतो. मॉम्प्रमाणेंच फिलिप्ला शारीरिक व्यंग – लुळा पाय – आहे. त्याच्या-प्रमाणें लहानपणींच आईबापांना तो आंचवतो; आपल्या रूढिप्रिय धर्मोपदेशक चुलत्याकडे रहाण्यास जातो; तेथें वास्तवतेचें दुःख विसरावयास लावणारी वाचनाची संवय त्याला जडते. शाळेंत कांहीं दिवस जाचक परिस्थितींत काढल्यावर तो पॅरिसला चित्रकला शिकण्यास जातो व दोन वर्षांनीं आपणास तें शक्य नाहीं असें पाहून परत येतो. दुसऱ्याच्या कल्पनांच्या, व्यक्तिमत्त्वाच्या, शारीरिक सुखोपभोगांच्या गुलामगिरींत फिलिप्ला अनेक वर्षें काढावीं लागतात. मिल्ड्रेड्-सारख्या अस्थिर, चंचल स्त्रीच्या मोहांत सांपडून तो बराच काळ चिंता, वैफल्य यांच्या कचाट्यांत सांपडतो. परंतु ह्याच सुमारास आपण वैद्यकीय शिक्षण घ्यावें अशी त्याला (कादंबरीकाराप्रमाणेंच) इच्छा होते व अनेक अडथळ्यांनंतर तो वैद्यकीच्या परीक्षा देतो. ह्यानंतर आत्मविश्वासाच्या नव्या जाणिवेनें तो प्रथम बौद्धिक वा भावनात्मक गुलामींतून बाहेर येऊन सॅली नांवाच्या निकोप, आनंदी मुलीशीं विवाह करतो... व्यक्तित्वाचा मध्यबिंदु न सांपडल्यामुळें भावनाप्रधान आयुष्याला कसें प्रवाहपतित वळण लागतें ह्याचें प्रातिनिधिक चित्रण ह्या कादंबरींत अगदीं वस्तुनिष्ठ, चिकित्सक, सत्यान्वेषी दृष्टीनें केलेलें आढळतें. कादंबरी–शिल्पाच्या दृष्टीनें ही कादंबरी भरभक्कम, चिरेबंद बांधणीची आहे. इतकी प्रदीर्घ आत्मपर कादंबरी मॉमनीं पुन्हां लिहिली नाहीं.

## जिवंत पात्रें

त्यांच्या पुढील कादंबरी-कथांची कल्पना 'अप् ॲट् ए व्हिला' ह्या कादंबरीवरून येईल. 'अप् ॲट ए व्हिला' ह्या कादंबरींतील पुढील संभाषण माम् यांचें खास वैशिष्ट्यपूर्ण असें आहे :

"हा तूं मूर्खपणा करते आहेस, मेरी! तूं मला नकार दिला आहेस... पण तें राहूं द्या. बाकी तुझ्या कल्पनेपेक्षां मी तुला नवरा म्हणून पुष्कळ शोभलों असतों. तूं स्वतःपेक्षां २५ वर्षांनीं मोठ्या नवऱ्याशीं लग्न करून मूर्खपणा करीत आहेस. किती वय आहे तुझं? तीस ना? तूं कांहीं मासाविसा नाहींस. नुसतं तुझ्या तोंडाकडे, तुझ्या डोळ्यांतील सौहार्दाकडे आणि तुझ्या देहाच्या रचनेकडे पाहिलं कीं सहज कळतं कीं तूं भावनांनीं रसरसलेली, इंद्रियोपभोगांना आतुर अशी स्त्री आहेस... आपल्या लैंगिक प्रवृत्ती तूं दाबूं शक-








शील का ? तुझें तें सुंदर शरीर प्रणयविलासांसाठीं बनलेलें आहे; तें तुला स्वतःचा अव्हेर करूं देणार नाहीं. आयुष्याचीं दारं बंद करायला तूं अजून फार तरुण आहेस ! ”

“ तुझी किळस येते मला, रावली ! तूं असं बोलतोस कीं जणुं शय्येवरच जीवनाची इतिकर्तव्यता होते ! ”

“ तुला कधीं कोणी प्रियकर नव्हता का ? ”

“ नाहीं, कधींच नाहीं. ”

“ तुझ्या नवऱ्याशिवाय अनेक लोकांनीं तुझ्यावर प्रेम केलें असेल. ”

“ कोणास ठाउक ! कांहीं जण तसें म्हणत असत; पण मला त्यांच्याबद्दल कधींच आकर्षण वाटलं नाहीं. प्रणयभावनांना मी बळी कधींच पडलें नाहीं. ”

“ आपलं तारुण्य आणि सौंदर्य तुला कसं फुकट घालवतं ? ह्या दोन्ही गोष्टी किती थोडा वेळ टिकतात ! ”

ह्यावर मेरी उत्तर देते कीं मी आपलें प्रेम एकाद्या गरीब, उपेक्षित अशा माणसाचें जीवन मोहरून टाकण्यासाठीं राखून ठेवलें आहे. रावली त्या कल्पनेचा उपहास करतो. लौकरच मेरीच्या आयुष्यांत एक तरुण इटालियन् गायक येतो. त्याच्याशीं ती आपल्या प्रासादांतील शय्यागृहांत एक रात्र प्रणयविलासांत काढते; आपल्या कल्पनेप्रमाणें अनुपम सुख त्याला देते ... हा प्रेमाचा एक क्षण असह्य होऊनच कीं काय तो माथेफिरू तरुण स्वतःवर पिस्तूल उडवून घेऊन आत्महत्या करतो ! ज्या रावलीचा तिनें धिक्कार केला त्याच्या मदतीनें तें प्रेत नाहींसें केलें जातें; मेरीचा विवाह सर एड्गर स्वीफ्ट ह्या आय. सी. एस्. अधिकाऱ्याशीं ठरलेला असतो. तो वयातीत असून बंगालचा गव्हर्नर होणार असतो. मेरी त्याला हें रहस्य सांगते तेव्हां तो आपल्या नोकरीवर पाणी सोडण्याची तयारी दर्शवितो. परंतु मेरीच त्याच्याशीं विवाह करण्याचें नाकारून भटक्या, दारुड्या परंतु वाचनाची आवड असलेल्या संभाषण-चतुर अशा रावलीशीं लग्न करते.......

मॉम् यांच्या वैशिष्ट्याच्या सर्व छटा असलेली ही लघुकादंबरी आहे. तंत्र पारंपरिक असलें तरी तींतील विषय व विशेषतः नीतिकल्पना पारंपरिक नाहींत. उन्मादक प्रणयप्रसंग, शरीरोपभोगांबद्दल निःसंकोचपणें केलेली चर्चा, अनैतिक, चोरट्या स्त्रीपुरुषसंबंधांची प्रांजळ, सफाईदार, आकर्षक वर्णनें, स्त्रीसौंदर्याचे विशेषतः स्त्रीच्या नग्नदेहाचें कलात्मक दर्शन – हीं मॉम् ह्यांच्या कादंबऱ्यांचीं आकर्षक वैशिष्ट्यें सांगतां येतील. ‘ केक्स् अँड एल् ’ मधील वयोवृद्ध कादंबरी-काराची तरुण द्वितीय पत्नी रोझी हें मॉम् ह्यांचें एक जिवंत पात्र आहे. ती एका मागून एक निरनिराळ्या पुरुषांशीं निःसंकोचपणें सुखोपभोग घेते; तरी कादंबरीं-तील निवेदक ॲशेंडन् तिचें समर्थन करतो आणि म्हणतो : “ ती जितकी सुंदर होती तितकीच चांगलीहि होती. तिच्या निसर्गप्रवृत्ती निकोप आणि बलशाली होत्या. तिला लोकांना सुखी करणें आवडत असें; प्रेमा-वर, प्रेमोपभोगावर तिचें प्रेम होतें. कोणी तिला आवडला कीं त्याच्याबरोबर झोंपायला जाणें तिला अगदीं सहज-गत्या करावेसें वाटे. हा तिचा दुर्गुण नव्हता. ती तिची सहजप्रवृत्ति होती. त्याचा तिच्या स्वभावावर परिणाम झाला नाहीं. ती मनमोकळी, निकोप, साधी, सहज-सुंदर राहिली. ” ‘ रेझर्स एज् ’ मधील इसाबेल आपण आपल्या विपन्नावस्थेंतल्या पतीचा त्याग कां करीत नाहीं, याचें निःसंकोचपणें कारण देतें कीं तो रात्रीं दहा वर्षांपूर्वींइतकेंच मला सुख देतो !

### भावनाविव्हलतेपासून अलिप्त

स्त्री-पुरुषसंबंध हा मॉमच्या कादंबरी-कथांचा प्रधान विषय असला व त्याचें वर्णन सफाईदार कलात्मक त्यांनीं केलें असलें तरी इंद्रियोपभोग मॉमच्या मतें दोषरहित नाहीं. ॲडम-ईव्हच्या नंदनवनांत सर्पानें प्रवेश केलाच होता त्याप्रमाणें तारुण्याच्या प्रथम सीमेवर पाऊल टेवलेल्या स्त्री-पुरुषांच्या प्रणयाचीं वर्णनें मॉम् रंगून जाऊन करीत असले तरी त्यासंबंधीं भावनाविव्हलतेच्या दोषापासून ते अलिप्त आहेत. स्त्रीपुरुष-आकर्षणाच्या मागें एक सुप्त वैमनस्य असतें व तें त्यांच्या निसर्गप्रवृत्तींतच आहे हें मानसशास्त्रीय ( कीं शारीरशास्त्रीय ? ) सत्य अति हळु-वारपणें डी. एच्. लॉरेन्सनीं आपल्या कादंबऱ्यांत दाखविलें आहे. तो बारकावा, त्या सूक्ष्म छटा मॉममध्यें नाहींत. परंतु त्या आकर्षणांत कांहींतरी भीतिप्रद आहे व त्याचा शेवट अनेक वेळां अत्याचारांत, रक्तपातांत आत्म-नाशांत होतो हेंहि मॉमनीं दाखवलें आहे. ‘ रेड ’ ह्या दीर्घ कथेंत ते म्हणतात : “ अतिप्रणयभावने-( Passion )ला नेहमीं दुःखाची झालर असते. ती कडवटपणानें डागळलेली किंवा मनःस्तापानें दूषित







झालेली असते. अनेक वेळां प्रणयाची परिणति परस्परांबद्दल उदासीनता वाढण्यांत होतें." म्हणून मॉम् यांच्या प्रणयकथा केवळ सुखासीनतेवर समाधान मानीत नाहींत. त्यांत एक तऱ्हेचा कडवटपणा दिसतो. 'रेड' या दीर्घ कथेंत रेड नांवाचा एक तरुण इंग्रज खलाशी आणि वेस्ट इंडीज् बेटावरील एक सादर्यसंपन्न ललना ह्यांचें तारुण्यांतील पहिलें निष्कलंक प्रेम त्यांनीं वर्णन केलें आहे. परंतु हें नंदनवन फार दिवस टिकत नाहीं. रेड्ला एक व्यापारीजहाज पळवून नेतें. निल्सन् हा कथानिवेदक त्याच्या प्रणयिनीशीं घरोबा करतो. तीस वर्षांनीं तिचें सौंदर्य नष्ट होतें. ती लठ्ठ आणि केवळ एक म्हातारी आदिवासी स्त्री बनते. तिचा तो प्रियकर पुन्हां परत येतो पण तोहि लठ्ठ झालेला, डोळे तारवटलेला, बोलण्याचालण्यांत अडदांड असा असतो ! तो तिला न भेटतां परत जातो. निल्सन्निवेदक– तिच्याकडे पहातो आणि त्याला प्रश्न पडतो " कसं आपण हिच्यावर प्रेम केलं ! "

केवळ प्रणयभावनांनीं शांति मिळत नाहीं परंतु प्रणयभावना ह्या जीवनांतील सर्वांत प्रबल भावना असतात हें मॉम् यांच्या कादंबऱ्यावरून दिसतें. त्यांच्या वाङ्मयाची पार्श्वभूमि खऱ्याखुऱ्या अर्थानें आंतरराष्ट्रीय आहे. स्वतःच्या दीर्घ प्रवासाचा, वेस्ट इंडीज्, फ्रान्स, इटली, अमेरिका येथील वास्तव्याचा उपयोग त्यांनी आपल्या कलेंत केलेला आहे. दूरदूरच्या, संस्कृतीपासून अलिप्त असलेल्या प्रदेशांत, निसर्गरमणीय बेटांत रहाणारा इंग्रज खलाशी, व्यापारी डॉक्टर, मळेवाला अथवा मिशनरी व त्याचा तेथील किंवा त्याच्या स्वतःच्या देशांतील स्त्रीशीं प्रणय ही त्यांच्या कथावाङ्मयांतील प्रधान घटना आहे. तिच्या अनेक छटा त्यांनीं वर्णन केल्या आहेत. मानवी स्वभावाचे विविध नमुने दाखविले आहेत. ह्या छटा वर्णून ते स्वतः त्यावर उपहासगर्भ, कधीं कडवट अशी मल्लिनाथी करतात. पात्रें, वर्णनें, घटना ह्यांना सुसंगतता यावी म्हणून अनेक वेळां निवेदन आत्मकथनपर करतात तर 'रेझर्स एज' सारख्या कादंबरींत स्वतःचें पात्र कादंबरींत आणतात. उच्चवर्णीय, सुखोपभोगांत मश्गूल झालेलीं स्त्रीपुरुषपात्रें, दुसऱ्याच्या किंवा आपल्या प्रणयिनीच्या पैशावर चैन करणारा मधमाशांतील नराप्रमाणें असलेला खुशालचेंडु, पुरुषाच्या प्रणयभावनेशीं खेळ करणारी प्रमत्त सौंदर्यशालिनी ह्यांवर मॉम आपल्या उपहासाचें अस्त्र सोडतात. परंतु ह्या स्वभावविशेषांकडे पाहाण्याची त्यांची दृष्टि नीत्युपदेशकाची नाहीं. ती एखाद्या निःपक्षपाती निरीक्षकाची आहे, जीवनाचे विविध रंग रसिकतेनें पहाणाऱ्या व त्यांचा कलात्मक आविष्कार करणाऱ्या कलावंताची आहे. एकादा डॉक्टर ज्या निरपेक्ष वृत्तीनें रोग्याची चिकित्सा करतो व ज्या भावनारहित वृत्तीनें रोगनिदान करतो तसें भावनाविवशतेपासून अलिप्त वस्तुनिष्ठ वर्णन मानवी भावनांचें, मानवी स्वभावांतील वेगवेगळ्या छटांचें मॉम् करतात. मॉम् स्वतः डॉक्टरीच्या परीक्षा पास झालेले आहेत ही गोष्ट येथें लक्षांत ठेवली पाहिजे. त्याच्या कथांतील वैचित्र्य आणि वैपुल्य मनाला स्तिमित करणारें आहे. ह्या वैचित्र्यपूर्ण, विविध घटनांना एकत्र गुंफणारी कलात्मक सुसंगति कधीं भंग पावत नाहीं; आयुष्यांतील उत्कट, नाट्यपूर्ण क्षणांचें वर्णन करण्यांत सुरसतेला कधीं कमतरता पडत नाहीं. अशा ह्या बहुरंगी, बहुविध कलासृष्टींतील सृजनांत मॉम् यांच्या चित्तवृत्ती स्थिरावल्या आहेत असें सुरवातीस उद्धृत केलेल्या अवतरणांवरून दिसतें.

### कलेमध्यें वृत्तीचें स्थैर्य

परंतु ह्या विविधतेपासून, ह्या वैचित्र्यापासून ह्या भिन्नभिन्न अनुभवांपासून कांहीं तत्त्वज्ञानाची गुंफण मॉमनीं केली आहे काय ? जीवन हें कांहीं विशेष सत्याचा, एखाद्या महान् ध्येयाचा आविष्कार आहे असें त्यांना वाटतें काय ? त्यांच्या बऱ्याच कादंबऱ्यांतील पात्रांच्या अस्थिर वृत्ती कलेमध्यें स्थिर झालेल्या आपल्याला दिसतात. 'मून अँड सिक्स पेन्स' मधील स्ट्रिकलँड किंवा 'थिएटर' मधील ज्यूलिआ किंवा 'कॅटालिना'ची नायिका ह्यांना आपापल्या कलेंत जीवनसर्वस्व सांपडल्याचा भास होतो. कलावन्तांचें कलेबद्दलचें प्रेम वर्णन करतांना मॉम यांचा नेहमींचा उपहास, व्याजोक्ति नाहींशी झालेली दिसतात. कलावंताच्या स्वतःच्या चित्तवृत्ती अतिप्रबल असतात. मनोव्यापारांपैकीं बऱ्याच मोठ्या शक्ती कलेकडे लावल्यामुळें इतर शरीरोपभोग मनसोक्त अनुभवल्याशिवाय त्या चित्तवृत्तींचा उपशम होत नाहीं, समतोल रहात नाहीं अशा तऱ्हेचें त्यांचें मत दिसतें. ह्या दृष्टीनें लिहिलेली 'मून अँड सिक्स पेन्स' ही त्यांची फार यशस्वी अशी कलाकृति आहे.








## भटक्या वृत्तीचें प्रतीक : 'व्हॅग्रंट मूड'

कलेच्या ध्येयाकडे ज्या आत्मीयतेनें मॉम् पाहूं शकतात तसें आयुष्यांतील दुसऱ्या कोठल्याच ध्येयाकडे ते पाहूं शकत नाहीं. आत्यंतिक धर्मभावना ही उपहासास्पदच आहे कीं काय असें त्यांना वाटतें. 'रेन्' ह्या त्यांच्या अत्यंत कलात्मक कथेंतील मिशनरी एका वेश्येला सुधारता सुधारतां स्वतःच तिच्याशीं विलास करतो; 'कॅटलिना'मध्यें लहानपणीं प्रत्यक्ष व्हर्जिन मेरीच्या दर्शनाचा साक्षात्कार झालेल्या नायिकेला शेवटीं नाट्यासारख्या कलेनें शांति लाभते. मानवी जीवन हें इतक्या विविधतेनें नटलें आहे, मानवी स्वभाव ही इतक्या परस्परविरोधी गोष्टींची जादूगाराची पोतडी आहे कीं ती एखाद्या ध्येयांत बसविणें, एखाद्या मूलभूत प्रवृत्तीचा ती परिपाक आहे असें म्हणणें चुकीचें आहे असेंच त्यांना वाटतें. 'दि हॅपी मॅन्' ह्या कथेंत ते म्हणतातः "राजकीय पुढाऱ्यांच्या आत्मविश्वासाबद्दल मला नेहमीं नवल वाटतें. जे सुधारक दुसऱ्यावर त्यांचें वर्तन सुधारेल किंवा ते चांगले होतील अशा तऱ्हेची उपाययोजना करण्याची मनीषा बाळगतात, त्यांचें मला नवल वाटतें. मी स्वतः कोणाला उपदेश करीत नाहीं. कारण, दुसऱ्यानें कसें वागावें हें सांगण्याआधीं दुसरा कसा आहे हें तर माहीत हवें ? पण जेथें मला स्वतःला मी कसा आहे हें कळत नाहीं तेथें दुसऱ्याबद्दल मला काय ज्ञान असणार ? आपल्यापैकीं प्रत्येकजण एका एकाकी मनोऱ्यांतील कैदी आहे आणि ह्यांतला प्रत्येक कैदी दुसऱ्या कैद्यांशीं–ज्यांची मिळून मानवजात बनली आहे–बोलण्याचा प्रयत्न करतो... बोलत असतां तो ज्या खुणा वापरतो त्यांचा प्रत्येकाचा अर्थ मात्र वेगवेगळा असतो !" ह्या समजुतीमुळेंच प्रचलित राजकीय प्रश्नांचा त्यांनीं आपल्या कलाकृतींना वास येऊं दिला नाहीं. आत्मा, धर्मभावना ह्या गोष्टींबद्दल तो संशयवादी तर आहेतच परंतु सामुदायिक अगर व्यक्तिगत ध्येयवादी प्रयत्नांबद्दलहि ते साशंक आहेत. ह्यामुळें हक्स्लेच्या कादंबऱ्यांप्रमाणें त्यांच्या कादंबऱ्या बुद्धिवादी कल्पनांनीं नटलेल्या नाहींत किंवा कोस्लरसारखी 'डार्कनेस ॲट नून' सारखी बौद्धिक रोमांचकथाहि त्यांनीं कधीं लिहिलेली नाहीं. 'ॲशेंडन्' ह्या कथासंग्रहांत चंद्रालाल ह्या नांवाचा हिंदी अत्याचारी त्यांना आकर्षक वाटतो तो त्यांच्या ध्येयवादापेक्षां त्याच्या युरोपीय प्रणयिनीमुळेंच ! स्वतः १९१६ च्या रशियन क्रांतीच्या वेळीं रशियांत ब्रिटिश गुप्त हेरगिरी करतांना साम्यवादाच्या ध्येयाचा स्पर्शसुद्धां त्यांना झालेला नाहीं. 'रेझर्स एज्' ह्या कादंबरींत लॅरी डॅरेलला वेदान्ताच्या तत्त्वज्ञानामुळें शांति लाभली असें ते दर्शवितात व हिंदुधर्माचें समर्पक वर्णन करतात. परंतु शेवटीं लॅरीच्या ब्रह्मज्ञानाचा शेवट काय होतो तर आपल्या मित्राचा रोग बरा करण्यांत आणि शेवटीं टॅक्सीड्रायव्हर होण्यांत ! त्याच्या मानसिक आंदोलनांपेक्षां सोफी मॅक्डॉनल्ड ह्या अतिकामभावनेनें पछाडलेल्या स्त्रीच्या स्वभावरेखनांत किंवा ईलियट टेंपलटन्सारख्या वेषवेड्या, शिष्टाचाराची फाजील काळजी घेणाऱ्या, मृत्युशय्येवरसुद्धां श्रीमंतघरच्या आमंत्रणाची वाट पहाणाऱ्या, फाजील प्रतिष्ठेनें घेरलेल्याच्या स्वभावदर्शनांत मॉमना अधिक यश मिळालेलें दिसतें. तुलनेनें हिंदी तत्त्वज्ञानाचा अधिक यशस्वी व चिंतनीय आविष्कार इ० एम्० फॉर्स्टर यांच्या 'पॅसेज् टू इंडिया' मध्यें दिसतो. वर्गीय भावनांमुळ व्यक्तित्वावर, व्यक्तींतील वैशिष्ट्यांवर जो बारकाईचा प्रकाश फॉर्स्टर किंवा मायर्ससारखे कादंबरीकार टाकूं शकतात त्यांपासून मॉम यांची कादंबरीसृष्टि दूर रहाते, रेक्स वॉर्नर, कोस्लर किंवा जॉर्ज ऑर्वेल ज्या कुशलतेनें ध्येयवादी आयुष्यें रंगवितात ती ध्येयवादी जीवनाबद्दलची समरसता मॉमना कधींच लाभलेली नाहीं. त्यांनीं वर्णन केलेल्या दहा मोठ्या कादंबरीकारांतील टॉलस्टॉयप्रमाणें वास्तवाच्या सर्व बाजू दाखविण्यांत, विविधतेच्या पडद्याआड लपलेलें मानवतेचें एकात्म सौंदर्य मॉम् यांच्या कादंबऱ्यांतून दिसत नाहीं. त्याच्या कांहीं कमनीय छटा त्यांच्या लघुकथांतून दिसतात. परंतु कादंबऱ्यांतून त्यांना मानवी मनाचें वैचित्र्य जसें प्रतीत झालेलें दिसतें तितक्या प्रमाणांत सौंदर्य प्रतीत झालेलें मात्र दिसत नाहीं. 'व्हॅग्रंट मूड' हें त्यांच्या अगदीं अलीकडच्या पुस्तकांचें नांव त्यांच्या आजपर्यंतच्या कलेंत व्यक्त झालेल्या भटक्या प्रवृत्तीला सार्थ असें वाटतें.

सौंदर्य, आत्मा, ज्ञान ह्या सर्वांबद्दल त्यांची संशयवृत्तीच प्रकट झालेली दिसते. "ए रायटर्स नोटबुक" ह्या १९४९ सालीं लिहिलेल्या पुस्तकांत ते म्हणतात : "सत्कृति ( Right Action ) होत नसेल तर








ज्ञानाचा उपयोग काय ? पण सत्कृति म्हणजे तरी काय ? " सत्तराव्या वाढदिवसाच्या वेळीं त्यांनीं आत्म्या-बद्दल पुढील उद्‌गार काढले आहेत : " आत्मा-म्हणजे माझी, मला झालेली जाणीव ( Consciousness); माझें मीपण ; माझ्यांत असलेलें माझें व्यक्तिमत्त्व, जें माझ्या विचार, भावना, अनुभव आणि शरीराच्या वैशिष्ट्यांनीं बनलें आहे. शरीराचीं वैशिष्ट्यें ह्या व्यक्तिमत्त्वाचें रूप बदलविण्यास खूपच मोठ्या प्रमाणांत कारणीभूत होतात. मी जर तोतरा बोलत नसतों, चार पांच इंच उंच नसतो किंवा माझ्या जबड्याचा आकार आतांपेक्षां अधिक चांगला असता तर माझ्या जीविता-बद्दलच्या, मानवजातीबद्दलच्या कल्पना निराळ्या झाल्या असत्या ! " आत्म्याची उन्नति चिंतनानें, ज्ञानगम्य अनुभवानें होते ह्याबद्दल त्यांना संशयच वाटतो.

### कलेची इतिकर्तव्यता सत्कृतींत

परंतु पांच वर्षांनंतर ह्याच पुस्तकाचीं शेवटचीं पानें लिहीत असतां त्यांच्या आजपर्यंतच्या मतांत कांहीं आश्चर्यकारक बदल झालेला दिसतो. ते म्हणतात : " ह्या वर्षांत मी पूर्वी माहीत नसलेल्या कांहीं गोष्टी शिकलों. एका जीवशास्त्रज्ञाकडून मानवी जीवित एक दिवस नष्ट होईल असें मला कळलें ". हें सांगून मॉम् पुढें म्हणतात : " एकंदर मानवी जीविताबद्दल विचार केला तर त्याची गोळाबेरीज निराशाजनक आहे असें दिसतें. मनुष्य ही निसर्गाची घोडचूक ( stupendous absurdity ) आहे असें वाटतें ! " ह्यानंतर त्यांनीं जे उद्‌गार काढले आहेत ते त्यांच्या आतांपर्यंतच्या कलेच्या आनंदवादी भूमिकेला विसंगत असे वाटतात. मॉम् म्हणतात : " कांहीं लोकांच्या मतें जगांत एकंदर निराशामय वातावरण असलें, तरी कांहीं थोर कलावंत निर्माण होतात ह्यांतच जीवनाची सफलता आहे. एखादा चित्रकार किंवा कवि ज्या जगांत निर्माण होतो तेथें इतर हालअपेष्टा असल्या तरी काय बिघडतें ? परंतु कलेला असें स्वयंपूर्ण, स्वतंत्र स्थान आहे असें मला वाटत नाहीं. मला वाटतें, कलेचें महत्त्व तिच्या परिणामांत आहे असें म्हणणारे पूर्वींचे तत्त्वज्ञानीच बरोबर होते. म्हणून कलेची इतिकर्तव्यता सौंदर्यांत नाहीं तर सत्कृतींत — ' right action ' मध्यें, आहे. कला ही केवळ सुख किंवा आनंद देणारी असेल तर ती कितीहि आध्यात्मिक असली तरी तिचा फारसा उपयोग नाहीं. तिचा परिणाम जर मनुष्याला सत्कार्यप्रवण करणारा नसेल तर तिची किंमत बुद्धिमंतांच्या अफूच्या गोळीपेक्षां अधिक नाहीं ! " ( पृ० ३४७, ३४८ ).

### सत्यान्वेषी ऋजुता

हिंदुस्थानांत कोणती गोष्ट विशेष आकर्षक वाटली असा प्रश्न केला असतां ' ए रायटर्स नोटबुक ' मध्यें ते म्हणतात : " ताजमहाल, बनारसचे घाट किंवा मदुरेचीं देवळें किंवा त्रावणकोरचे पर्वत ह्यांपेक्षा मला अर्धनग्न, रोड, हीनदीन असा हिंदी शेतकरी आवडला ! " ' साल्वाटोर 'सारख्या एखाद्याच कथेंत ते एका सामान्य कोळ्याच्या विशुद्ध चांगुलतेचें तन्मयतेनें वर्णन करतात. आजपर्यंतच्या मॉमच्या कलाकृतींचें वैशिष्ट्य हें कीं त्यांनीं आपल्या अनुभवाच्या मर्यादा ओळखल्या व त्यांच्या लक्ष्मणरेषेंत राहून ज्या व्यक्ती–कृती – ( व ) – वृत्तींमध्यें आपल्या चित्तवृत्ति तल्लीन झाल्या, त्यांचा कलेंत वस्तुनिष्ठ, सत्यान्वेषी ऋजुतेनें गौरव केला. परंतु ह्या बदलत्या दृष्टिकोणामुळें अनुभूतीच्या नव्यानव्या कक्षा त्यांना प्रतीत होणें अजूनहि शक्य आहे. " आपण आपल्या ' लिझा ऑफ् लॅंबेथ् ' ह्या प्रथमकृतींत जसें लंडनच्या गरीब वस्तीचें वर्णन केलें तशा तऱ्हेची आणखी एक कादंबरी लिहिण्याच्या विचारांत होतों; पण आतां हा जीवनमधु पिळण्यास आपणांस बळ नाहीं " असे आर्त उद्‌गार त्यांनीं काढले आहेत. तरीसुद्धां कलेची परिणति केवळ आनंद नसून सत्कार्यप्रवणता आहे हें नवें सत्य प्रतीत झाल्यावर, संध्या-छाया या हृदयाला भिववीत असूनहि एखाद्या महान् कलाकृतीची निर्मिति करून आपल्या प्रतिभेचा नवा उन्मेष त्यांनीं दाखवावा अशीच कोणीहि इच्छा करील !

---










डब्ल्यु. समरसेट् मॉम् . अनु. प्रा. अ. के. भागवत

# एका नवख्या प्रदेशांत–!

मी वृत्तीनें भटक्या आहे. पण मी प्रवास करतों तो भव्य स्मारकें पहाण्यासाठीं नव्हे; त्यांचा मला कंटाळा आहे. निसर्गसौंदर्य पहाण्यासाठीं सुद्धां नव्हे; त्याच्यांत माझें मन रमत नाहीं. मीं माणसें बघण्यासाठीं फिरतों. त्यांतहि मोठ्यांच्या वाटेला मी जात नाहीं. एकाद्या देशाच्या अध्यक्षाला किंवा राजाला भेटण्यासाठीं मी रस्ता सुद्धां ओलांडणार नाहीं. लेखकाची ओळख त्याच्या पुस्तकाच्या पानांत झालेली मला पुरते; चित्रकाराची ओळख त्याच्या चित्रांमुळें झालेली बरी असें मला वाटतें. परंतु एकाद्या मिशनऱ्याबद्दल मला एकादी चमत्कारिक गोष्ट कळली तर मात्र मीं शेकडों मैल प्रवास केला आहे. किंवा एकाद्या बिलिअर्ड मार्करबद्दल माहिती कळवी म्हणून मी कधी अगदीं भिकार होटेलमध्यें पंधरा दिवस सुद्धां काढले आहेत. सामान्यपणें कोणत्याहि प्रवृत्तीचा माणूस आढळला तरी मला फारसें आश्चर्य वाटत नाहीं. परंतु एक विशिष्ट प्रकृतीची व्यक्ति मात्र मला पुनः पुन्हां भेटली आहे आणि तिच्यामुळें राहून राहून नवल वाटलें आहे. ही व्यक्ति म्हणजे वयांतीत अशी सुखवस्तु इंग्रज स्त्री. ही जगांतल्या कोठल्याहि कानाकोपऱ्यांत अगदीं अनपेक्षितपणें भेटते. एकाद्या इटालिअन् शहरामध्यें दूरच्या एकाद्या प्रासादतुल्य इमारतींत सर्व शहरामध्यें एकटीच इंग्रजबाई रहाते असें कळलें तर त्यांत आश्चर्यकारक कांहीं नाहीं. चीनमध्यें, पॅसिफिक बेटांत – जगांत कुठेंहि ह्या स्त्रिया रहातात. परके लोक – अगदीं आपल्या देशांतले सुद्धां – भेटावे असें त्यांना वाटत नाहीं. अगदीं एकाकी, निर्मित्र असें आयुष्य त्या कंठतात. कधीं तुम्ही त्यांना रस्त्यांत भेटलांत तरी त्या तुमच्याशीं – तुम्ही इंग्रज आहांत हें ओळखून सुद्धां – मुळींच ओळख दाखवणार नाहींत आणि तुम्हीच ओळख दाखवलीत तर तुम्हांला घरीं बोलावतील आणि अगदीं इंग्लंडांत असल्याप्रमाणें तुम्हाला चांदीच्या चहादाणींतील चहा देतील आणि खास वर्सेटरमध्यें तयार झालेल्या बशींतून स्कॉच् केक् देतील. त्या तुमच्याशीं अगदीं नम्रतेनें बोलतील पण तुमची ओळख वाढविण्याचा प्रयत्न करणार नाहींत. कोणत्या एका चमत्कारिक प्रेरणेमुळें, नैसर्गिक प्रवृत्तीनें त्यांना असा विजनवास आवडतो ह्याचें विचार करून सुद्धां मला उत्तर सांपडलेलें नाहीं. ह्यांत त्यांच्या साहसवृत्ती संतुष्ट होतात कीं स्वातंत्र्यलालसा ?

परंतु मला भेटलेल्या असल्या साऱ्या इंग्रज स्त्रियांत– किंवा जास्त म्हणजे ऐकलेल्या; कारण ह्यांतल्या बऱ्याच मुळींच भेटत नाहींत – सर्वांत माझ्या स्मृतींत जास्त वेळ राहिलेली मध्यपूर्व आशियांतील एक स्त्री आहे. कंटाळवाणा, लांबलचक प्रवास करून मी एका लहानशा गांवीं आलों होतों. एका प्रसिद्ध पर्वतावर आरोहण करण्याचा माझा बेत होता. तळाशींच असलेल्या एका बारीकशा होटेलमध्यें मी उतरलों. बाहेरच्या पुस्तकांत माझें नांव लिहिलें. रात्र बरीच झाली होती. मी माझ्या खोलीकडे गेलों. थंडी बरीच होती. कपडे बदलीत असतां मी कांकडलों. पण दुसऱ्याच क्षणीं दारावर थाप ऐकूं आली आणि दरवान् आंत आला.

"सिनोरा निकोलिनीनीं आपल्याला नमस्कार सांगितला आहे," आणि त्यानें माझ्या हातांत एक गरम पाण्याची पिशवी दिली. मीं ती आश्चर्यानें पण कृतज्ञतेनें घेतली.

"सिनोरा निकोलिनी कोण ?" मीं विचारलें.

"ह्या होटेलच्या मालकीणबाई" तो उत्तरला.

मी तिला आभार कळविण्यास सांगितलें. तो गेला. ह्या म्हाताऱ्या इटालिअन् बाईजवळ एकादी सुंदर गरम पाण्याची पिशवी असेल ह्या गोष्टीची मी कधीं अपेक्षासुद्धां केली नव्हती. असल्या वेळीं ह्या पिशवीइतकी दुसरी कोणतीच वस्तु मला प्रिय नव्हती. ( युद्धाचा आपणा सर्वांनाच कंटाळा आला आहे म्हणून नाहींतर मीं तुम्हांला, फ्लांडर्समध्यें एका बॉम्बवर्षाव होणाऱ्या घरांतून एक गरम पाण्याची पिशवी आणण्यासाठीं सहा लोकांनीं आपला जीव कसा धोक्यांत घातला








त्याची हकीगत सांगितली असती ! ). दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रत्यक्ष भेटून तिच आभार मानावे म्हणून तिची भेट होईल का म्हणून मीं चौकशी केली. ती येईपर्यंत पाण्याच्या पिशवीला इटालिअनमध्यें काय म्हणत असतील ह्याबद्दल मी खूप विचार केला. तेवढ्यांत ती आंत आली : एक ठेंगणीठुसकी लठ्ठ बाई, थोडी प्रतिष्ठित, डोक्यावर काळी लेस्ची टोपी आणि अंगांत एक लेसचें एप्रन्. हात बांधून ती उभी राहिली. मी स्तिमित झालों. ती इंग्रजी घरांतल्या कामवाल्या बाईसारखी दिसत होती.

" आपण मला बोलावणं पाठवलंत ? "

ती इंग्रज होती आणि त्या थोडक्याशा शब्दांत तिचे शहरी उच्चार स्पष्ट ओळखूं येत होते.

मी अंमळ गांगरून उत्तर दिलें, " त्या पाण्याच्या पिशवीबद्दल मला तुमचे आभार मानायचे होते. "

"खालच्या सहीवरून आपण इंग्रज आहांत हें मला कळलें आणि कोणीहि इंग्रज सद्गृहस्थ इथें राह्यला आला कीं मी नेहमीं त्याला गरम पाण्याची पिशवी पाठवतें, " ती म्हणाली.

" फार उपकार आहेत तुमचे, " मी म्हणालों.

" मी पुष्कळ वर्षे लॉर्ड ऑर्म्सकर्कच्या घरीं नोकरीला होतें. ते नेहमीं गरम पाण्याची पिशवी घेऊन प्रवासाला जात. आणखी आपल्याला कांहीं हवें काय ? "

"नाहीं, आभारी आहे ! " मी उत्तरलों. तिनें नम्रतेनें मान हालवून मला अभिवादन केलें व ती गेली. मला नवल वाटूं लागलें कीं ही गंमतीची म्हातारी इंग्रज बाई ह्या मध्यपूर्वेच्या एकाकी होटेलची मालकीण बनली कशी ! तिची जास्त ओळख करून घेणें अवघड होतें. कारण स्वतःचा दर्जा तिला माहीत होता. कमी अधिक ती केव्हांहि बोलली नसती. उगीच का ती एका प्रतिष्ठित, श्रीमंत इंग्रज कुटुंबांत इतकें वर्षे नोकर होती ? पण माझा निश्चय पक्का होता. आणि शेवटीं तिनें आपल्या लहानशा खोलींत मला चहाला बोलावलें. तेथें मला कळलें कीं ती लेडी ऑर्म्सकर्कची खाजगी दासी होती आणि सिनॉर निकोलिनी ( आपल्या नवऱ्याचा उल्लेख तिनें ह्या सन्माननीय उपाधीशिवाय कधींच केला नाहीं ! ) त्याच घरांत मुख्य स्वैपाकी होता. सिनॉर निकोलिनी उमदा, स्वरूपसुंदर होता आणि कित्येक वर्षे त्या दोघांचें ' रहस्य ' जमलें होतें. थोडे पैसे सांचवल्यावर त्यांनीं लग्न केलें, नोकरी सोडली आणि होटेल विकत घेण्यासाठीं खटपट चालवली. एका वर्तमानपत्रांतील जाहिरात पाहून सिनॉर निकोलिनीनीं हें होटेल घेतलें. कारण दूरदूरचे देश पहावे अशी त्यांची महत्वाकांक्षा होती. ही गोष्ट तीस वर्षांपूर्वीची. सिनॉर निकोलिनीला मरूनसुद्धां पंधरा वर्षे झालीं होतीं. सिनोरा निकोलिनी एकदां सुद्धां इंग्लंडला गेली नव्हती. मी विचारलें : " घरची आठवण तुम्हांला होत नाहीं का ? "

" अगदींच मला जायला आवडणार नाहीं असं नाहीं ! पण आतां तिकडे खूप बदल झाला असेल. माझ्या घरच्या लोकांना मी परदेशी माणसाशीं लग्न केलेलें कांहीं आवडलं नाहीं. तेव्हांपासून माझा त्यांचा कांहीं संबंध नाहीं. इथे सगळेंच कांहीं घरच्यासारखें आहे असें नाहीं. पण थोड्या वेळानें सगळ्याची संवय होते माणसाला. इंग्लंडमधलं तेंच तें आयुष्य मी पुन्हां कशी जगूं शकेन कोणास ठाऊक ! "

मी हंसलों. तिचे उद्गार तिच्या स्वभावाशीं विसंगत होते. शिष्टाचाराचा, सभ्यपणाचा ती नमुना होती. तीस वर्षे ह्या दूरदेशांत जवळ जवळ संस्कृतिहीन प्रदेशांत राहून तिला कसलाहि स्पर्श झालेला नव्हता. मला स्वतःला तुर्की भाषा येत नव्हती. पण ती जलद तुर्की बोलत असे. पण माझी खात्री आहे कीं ती अगदीं चुकीचें बोलत असावी. एका प्रतिष्ठित खानदानी इंग्रज स्त्रीची दासी म्हणून ती पहिल्याइतकीच शिष्टाचारांबद्दल दक्ष अशी राहिली होती. तिला कोणत्याहि गोष्टींबद्दल विस्मय वाटत नसे. जो इंग्रज नाहीं तो परदेशी म्हणजे कोणीतरी दीन दुबळा ! त्याच्याबद्दल दया – अनुकंपा तिला वाटे. आपल्या नोकरांवर ती वर्चस्व गाजवी. – कारण, मोठ्या घरांत आपल्या हाताखालीं नोकर कसे वागवावे त्याची तिला माहिती होती – हॉटेल अगदीं स्वच्छ, व्यवस्थित होतें.

मी तिला ह्याबद्दल गौरवपर बोललों तेव्हां ती म्हणाली, " मी माझ्याकडून प्रयत्न करतें. परदेशी लोकांना आपल्यासारख्याच कल्पना असणें शक्य नाहीं. पण लॉर्डसाहेब म्हणत असत ' पार्कर, आपल्यापाशीं असलेल्या कच्च्या मालाचाच उपयोग करून घेतला पाहिजे ! ' "

परंतु एक अत्यंत मोठा आश्चर्याचा धक्का तिनें माझ्यासाठीं अगदीं निघण्याच्या वेळेपर्यंत हातचा








राखून ठेवला होता.

" आपण माझ्या दोघा मुलांना भेटून जात आहांत ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे, " तिनें नम्रतेनें सुचवलें.

" तुम्हाला मुलें आहेत हें माहीत नव्हतं मला ! " मी म्हटलें.

" कामासाठीं ते दोघेहि बाहेरगांवीं असतात; पण आतांच ते परत आले आहेत. आपल्याला आश्चर्य वाटलें त्यांना पाहून. मीच त्यांना माझ्या हातानें शिकविलें आहे आणि माझ्यानंतर त्यांना हें होटेल मिळेल...... "

आणि दुसऱ्याच क्षणीं दोघे उंचेपुरे तांबडेलाल दणगट तरुण आंत आले. तिचे डोळे आनंदाने चमकले. त्यांनीं तिला बाहुपाशांत घेतलें आणि तिचीं सशब्द चुंबनें घेतलीं.

" त्यांना इंग्रजी येत नाहीं, " ती म्हणाली, " थोडें थोडें समजतं. तुर्की त्यांना चांगलंच येतं आणि ग्रीक आणि इटालिअन् ".

मी त्यांच्याशीं हस्तांदोलन केलें आणि तिनें त्यांना कांहीं तरी सांगितल्यावर ते बाहेर गेले.

" मोठे उमदे तरुण आहेत ते, सिनोरा ! " मी मनापासून म्हणालों. " तुम्हाला अभिमान वाटत असेल त्यांचा. "

" अर्थात्, आणि मोठी चांगलीं, आज्ञाधारी मुलं आहेत तीं. एक क्षणसुद्धां त्यांनीं मला कधीं त्रास दिलेला नाहीं जन्मापासून. आणि अगदीं सिनॉर निकोलिनीसारखे आहेत दिसायला हुबेहुब. "

"त्यांची आई इंग्रज आहे हें ओळखूं देखील येणार नाहीं कोणाला ! "

" मी त्यांची आई नाहीं, तसंच म्हटलं तर. मी त्यांना त्यांच्या आईकडेच पाठवलं आहे आत्तां. "

माझ्या चेहऱ्यावरचा गोंधळ मला लपवतां आला नाहीं.

"ते सिनॉर निकोलिनींना इथें काम करणाऱ्या एका ग्रीक मुलीपासून झालेले मुलगे आहेत. मला स्वतःला मूल नाहीं म्हणून मी घेतलं आहे त्यांना. "

मला काय बोलावें तें सुचेना !

ती थोडी ताठ उभी राहून म्हणाली, " आपण सिनॉर निकोलिनींना दोष देऊं नये ह्याबद्दल. आपण भलतं कांहीं वाटून घेऊं नये असं म्हणायचंय मला. " तिनें आपले हात बांधले आणि अभिमान, शिष्टपणा, समाधान ह्यांनीं संमिश्र अशा आवाजांत ती म्हणाली.

" ताजं, गरम रक्त सळसळत होतं सिनॉर निकोलिनींच्या अंगांत ! "

---

## साभार पोहोंच

**मराठी संशोधन–पत्रिका** ( त्रैमासिक ) – **मराठी संशोधनमंडळ**, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाकुरद्वार, मुंबई २. **संपादकमंडळः ह. दा. वेलणकर, रा. ना. वेलिंगकर, अ. का. प्रियोळकर** ( कार्यकारी संपादक ), वर्ष १ लें. ऑक्टोबर १९५३. अंक १ ला., वार्षिक वर्गणी ३ रु. फुटकळ अंकास १ रु.

**केशव भिकाजी ढवळे, कर्नाटक हाऊस, चिराबाजार, मुंबई २.** यांनीं ( १९५३ ) प्रकाशित केलेलीं पुढील पुस्तकें :

( १ ) **नऊ नाथ : ( १ ) मच्छिन्द्रनाथ** – लेखकः श्री. भा. श्री. परांजपे पानें १ – ८०. मूल्य १२ आणे. ( २ ) **'सुधारक' कर्ते आगरकर** – लेखक श्री. दा. न. शिखरे. पानें १ – ४८. मूल्य ८ आणे. ( ३ ) **महान् मुत्सद्दी ना. गोखले** – लेखक श्री. दा. न. शिखरे. पानें १ – ४८. मूल्य ८ आणे. ( ४ ) **नाट्याचार्य खाडिलकर** – लेखक श्री. दा. न. शिखरे पानें १ – ५२. मूल्य ८ आणे. ( ५ ) **शीखांचे गुरु** – लेखक श्री. र. ल. उपासनी. पानें १ – ८८. मूल्य १४ आणे. ( ६ ) **निळें कमळ** – लेखक बा. गो. नाईक. पानें १ – ६४. मूल्य १० आणे. ( ७ ) **हृदयाची हांक** ( संक्षिप्त ) – वि. स. खांडेकर, संक्षेपक पु. रा. लेले. पानें १ – ११२. मूल्य १। रु. ( ८ ) **नाट्यच्छटा व संवाद** – लेखक प्रि. के. गो. पंडित. पानें १ – ४४. मूल्य ८ आणे. ( ९ ) **भारत असा लढला : १ रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ?** – लेखक पु. रा. लेले. पानें १ – ७२. मूल्य १ रु. ( १० ) **जरा आंवतींभोंवतीं** – सौ. लीला मस्तकार रेळे. पानें १ – २४. मूल्य ८ आणे. ( ११ ) **संजूचें स्वप्न** – लेखक व चित्रकार श्री. नारायण द. गाडगीळ पानें १ – २४, मूल्य ८ आणे.

---



अनुक्रमणिका








परिचय आणि रसग्रहण : प्रा. ग. प्र. प्रधान

# सॉमरसट मॉमचें 'पेनेलोप'

विसाव्या शतकांतील नामवंत लेखकांत **सॉमरसेट् मॉमची** गणना होते. वयाच्या तेविसाव्या वर्षी त्याचें पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें तेव्हांपासून गेलीं सत्तावन वर्षे त्याची साहित्यनिर्मिति अप्रतिहत चालू आहे. कथा, कादंबरी व नाटक या तीनहि क्षेत्रांत त्याच्या लेखणीनें अनिरुद्ध संचार केला आहे आणि जगांतील विविध थरांतील वाचकांना त्याच्या लेखणीच्या लीलांनीं सुखविलें आहे. मॉमच्या सर्व लेखनाचें अगर जीवनदृष्टीचें मूल्यमापन करण्याचा माझा उद्देश नाहीं. त्याच्या एका नाटकाचा केवळ परिचय मी करून देणार आहे. परंतु लेखकाची एक कलाकृति समजून घ्यावयाची असली तरी त्याच्या लेखनाचे ठळक विशेष माहीत असणें अवश्य आहे असें मला वाटतें. **सामरसेट मॉमनें** जीवनाच्या विविध छटा मार्मिकतेनें अवलोकिल्या आहेत. मानवी मनाचें त्याचें ज्ञान मोठें सखोल आहे. त्यानें 'सेक्रेड फ्रेम' या नाटकांत जीवनांतील उदात्ततेचें चित्रीकरण केलें आहे. 'मून ॲन्ड सिक्स पेन्स' या कादंबरीमध्यें एका असामान्य कलावंताचें कलाजीवन दाखविलें आहे. 'रेझर्स एज' या कादंबरींत एका तरुणाची आध्यात्मिक शांतीसाठीं चाललेली धडपड दाखविली आहे. परंतु या छटा चित्रित करतांनाहि मॉमचें कांहीं वेगळेंच वैशिष्ट्य आहे हें चटकन् जाणवतें. मानवी मनांतील दंभ, आत्मवंचना, आत्मतृप्ति या छटांचें खेळकर उपरोधानें वर्णन करणें हें मॉमचें वैशिष्ट्य आहे असें मला वाटतें. माणसाच्या स्वभावांतील उणीवांबद्दल मॉमला तिटकारा वाटत नाहीं. मानवस्वभावाचें सखोल विश्लेषण करण्याचाहि त्याचा उद्देश नसतो. परंतु या सर्व पैलूंचें कांहीं व्यक्तिरेखाद्वारां व कांहीं घटनाद्वारा दिग्दर्शन करून तो जीवनाच्या अंतरंगावर भेदक प्रकाश टाकतो व सामान्य घटनांतीलहि नाट्य दाखवितो.

'पेनेलोप' हें मॉमच्या सुविख्यात नाटकांपैकीं एक नसलें तरी रंगभूमीवर यशस्वी झालेलें एक नाटक आहे. मॉमच्या प्रतिभेचे ठळक विशेष या नाटकांत दिसून येतात. नाटकाची सुरवात कांहींशीं सामान्य वाटतें. पण अल्पावधींतच या सुरवातीचें नाट्य जाणवतें. डेव्हनपोर्ट बार्लो, मिसेस् गोलाइटली, प्रा. गोलाइटली व मि. ब्रेड्स्वर्थ अशा चार व्यक्ती एकामागून एक प्रवेश करतात. या चारहि व्यक्तींना पेनेलोप ( गोलाइटली-दांपत्याची कन्या ) हिजकडून वेगवेगळया तारा आलेल्या असतात व म्हणून ते तिला तांतडीनें भेटावयाला येतात. पेनेलोप ही शेजारच्या खोलींत बसलेली असते व या प्रत्येकाचें कोणत्या रीतीनें स्वागत करावयाचें, हें तिनें पैटन या परिचारिकेला सांगून ठेविलेलें असतें. प्रत्येकाला वाचावयाला दिलेलें वतमानपत्र व प्रत्येकाच्या आवडीचें पेय यावरून या स्वभावरेखा चटकन् स्पष्ट होतात. या चौघांपैकीं प्रत्येकाला इतर कां आले आहेत तें समजत नाहीं. बार्लो हा स्वतःच्या येण्याचें कारण सांगतो. – त्या सर्वांना आढळून येतें कीं त्यांना मिळालेल्या चार तारांचा परस्परांशीं संबंध दिसत नाहीं. ते अशा बुचकळयांत पडले असतां पेनेलोप प्रवेश करते व खुलासा करते. ती म्हणते : 'I wanted you all to come immediately and I thought the best thing was to trail your ruling passions under your noses.' या हेतूनें, बड्या लोकांत वावरण्याची हौस असलेल्या बार्लोला केलेल्या तारेंत एका डचेसचा उल्लेख होता, तर मिशनऱ्यांच्या कामाबद्दल आस्था बाळगणाऱ्या मिसेस् गोलाइटला केलेल्या तारेंत सेंट्रल आफ्रिकन मिशनचा निर्देश होता. गणिताचा प्राध्यापक गोलाइटली याला केलेल्या तारेंत पेनेलोपनें दशांश चिन्ह देऊन आपला टेलिफोन नंबर लिहिला होता. सहा व आठ पेन्स असा मजकूर लिहिल्यावर वकील धावत येणारच या अपेक्षेनें ब्रेड्स्वर्थला त्या मजकुराची तार केली होती! पेनेलोपच्या या पोरकटपणामुळें व आपण निष्कारण आलों या जाणीवेनें, हे चौघेहीजण अस्वस्थ होतात.



अनुक्रमणिका






व मिसेस् गोलाइटली कांहींशा तीव्रतेनें विचारते, “ मग तुला करावयाचें तरी काय आहे ? ”. यावर पेनेलोप एकदम उत्तर करते, ‘ मला माझ्या नवऱ्यापासून घटस्फोट घ्यावयाचा आहे. ’ या एका वाक्यांत सारेंच वातावरण बदलतें ! या ठिकाणीं संवाद मोठे खटकेबाज झाले आहेत.

पेनेलोपच्या वाक्यानंतर इतरांच्या होणाऱ्या प्रतिक्रिया मॉमनें मोठ्या कौशल्यानें दाखविल्या आहेत. पेनेलोपचा नवरा डिकी ( डॉ. ओफॅरेल ) हा वरवर तिच्याशीं प्रेमानें वागत असतो. परंतु अलीकडे ॲडा फर्ग्युसन या पेनेलोपच्या मैत्रिणीशीं त्याची मैत्री वाढत चाललेली असते. ह्या चोरटा प्रेमसंबंध लक्षांत आल्यावर पेनेलोपला जीवन असह्य वाटूं लागतें व ती घटस्फोट घेण्याचा निश्चय करते. पेनेलोप व डिकी यांचें वैवाहिक जीवन अतिशय सुखी आहे अशी सर्वांची कल्पना असते व त्यामुळें ही बातमी ऐकून त्यांना धक्काच बसतो. प्रा. गोलाइटली हा मात्र शांतपणें तिला “ तूं सारखी नवऱ्याच्या खुर्चीवर रेलून बसतेस का ? तो बाहेरून आल्यावर ‘ कोठून आलांत ’ असें विचारतेस का ? ” असे प्रश्न विचारतो. पेनेलोप अर्थातच आपण किती उत्कटतेनें नवऱ्यावर एकसारखें प्रेम करतो हें सांगते. यावर बाळें हा तावडतोब घटस्फोट घ्यावा असें सुचवितो व डॉक्टरचा पेशा हा खानदानी नव्हेच, डॉक्टरशीं लग्न केल्यावर ही अवस्था येणारच हें पटवून देत असतो. प्रा. गोलाइटली मात्र शांतपणें एका कागदावर २+२ =५ असें लिहीत असतो ! तें पाहून धक्क्यामुळें त्याच्या मनावर मोठा परिणाम झाला असावा असें इतरांना वाटतें व मिसेस् गोलाइटली ‘ याचा अर्थ काय ? ’ म्हणून तीव्रतेनें विचारते. प्रा. गोलाइटली प्रथम कांहींसें संदिग्ध बोलतो. पण नंतर आपलें म्हणणें स्पष्ट करतो : ‘ या प्रकरणांत पेनेलोपचाच दोष आहे. माझी बायको माझ्याशीं अशी वागली असती तर मीहि असेंच केलें असतें. ’ हे प्राध्यापकमहाशयांचे उद्‌गार ऐकून सारेच चकित होतात. त्यांच्या मतें पेनेलोपचें क्षणाक्षणाला व्यक्त होणारें प्रेम कोणत्याहि नवऱ्याला जीवन असह्य करील ! तों म्हणतो : ‘अति गोड खाऊन ज्याप्रमाणें तोंडाला मिठी बसते तसें डिकीचें झालें आहे. याच्यांतून सुटण्याचा मार्ग एकच आणि तो म्हणजे डिकी व ॲडा यांचा अधिकाधिक संबंध येईल अशी व्यवस्था करणें. ” या उपाययोजनेनें डिकीच्या चोरट्या प्रेमांतील चव निघून जाईल अशी गोलाइटलीची खात्री असते. इतक्यांत डिकी येतो. जरा वेळानें ॲडाहि येते. इतरांच्या डोळयांत धूळ फेकण्यासाठीं, मिसेस् मॅक नांवाची एक वृद्ध बाई आपली पेशंट असून ती फार आजारी असल्यामुळें आपणाला सारखें बाहेर जावें लागतें, असें तो सांगतो. संभाषणाच्या ओघांत ॲडाहि ही बनवाबनवी चालूं ठेवतें. स्वतःच्या धूर्तपणावर हीं दोघेंहि खूष असतात पण कोण कोणाला बनवीत आहे हें माहीत असल्यामुळें वाचकांची मोठीच करमणूक होते. यानंतरचा नाटकाचा बराच भाग हा याच ‘ ड्रॅमॅटिक आयरनी ’ नें व्यापलेला आहे. पेनेलोप ही बापाच्या सांगण्याप्रमाणें डिकीपासून दूर दूर रहाते व यांत आपल्याला विशेष कांहींच वाटत नाहीं असें भासवते. डिकीला अर्थातच चुकल्याचुकल्यासारखें होतें. डिकीला ॲडाबरोबर जास्त रहाण्याची संधि मिळावी अशाच तऱ्हेनें पेनेलोप वागते. हें करतांना तिला अतिशय मानसिक ताण पडतो. परंतु प्रा. गोलाइटलीमुळें तिला हें शक्य होतें. शिवाय ती एकसारखें नवीन भारी कपडे विकत घेते व डिकी रागावला असतां, त्याला म्हणते, “ मिसेस् मॅकसारखी खूप पैसे देणारी पेशंट् असल्यावर पैशाची काय फिकीर ? शिवाय तूं दूर गेलास कीं भारी कपडे विकत घेणें हाच माझा विरंगुळा. ” बिचारा डिकी ! बायकोचें कपडे विकत घेणें व प्रेयसीच्या हौशी पुरविणें यामुळें वैतागून जातो. ॲडाच्या हट्टामुळें त्यानें तिच्याबरोबर पॅरिसला जाण्याचें कबूल केलेलें असतें व मिसेस् मॅकला प्रकृतीसाठीं पॅरिसला नेणें आवश्यक आहे अशी तो थाप मारतो. अर्थात् पेनेलोपला हें सर्व माहीत असतें. तिच्या अंगाचा मत्सरानें भडका उडालेला असतो. परंतु मोठ्या संयमानें ती आपणाला कांहींच माहीत नाहीं असें सोंग वठवीत असते. पॅरिसला जाण्यासंबंधीं सर्व कांहीं ठरलें असतां स्त्रीस्वभावानुरूप ॲडा फर्ग्युसन पुन्हा डिकीला भेटावयास येते. प्रेमाच्या या लोंढ्यामुळें डिकी घाबराघुबरा होतो व ॲडाला नेहमींचीं वचनें देऊन कशीतरी वाटेला लावतो. तो आपला अस्वस्थपणा लपविण्यासाठीं पेनेलोपला म्हणतो : “ ॲडाहि पॅरिसला येणार आहे हें ऐकून तुला आश्चर्य

वाटलें असेल नाहीं ? " यावर पेनेलोप शांतपणें उत्तरते : " मला हें सर्व आधींच ठाऊक होतें. " यानंतरचे संवाद फारच सुंदर आहेत. आपला चोरटा प्रेमसंबंध माहीत असून आपली बायको त्रागा करीत नाहीं, रागावत नाहीं हें पाहून डिकी अतिशय संतापतो. चोरट्या प्रेमांतील लज्जत अर्थात्‌च नाहींशी झालेली असते. तो जितका अधिक चिडतो तितकाच शांतपणा पेनेलोप दाखविते. इतक्यांत प्रा. गोलाइटली व त्याची पत्नी येतात, त्यांच्याजवळ 'मी करीत असलेली फसवणूक माहीत असून पेनेलोप रागावत नाहीं याचा अर्थ काय ?' अशी तक्रार डिकी करतो. आपण घोर अपराध केला आहे अशी टोचणी त्याला लागलेली असते. पण प्रा. गोलाइटली हेंहि समाधान त्याला मिळूं देत नाहीं. तो म्हणतो : 'स्वतःचा अपराध निष्कारण भडकपणें रंगवूं नकोस.' यावेळची डिकीची त्रेधा दाखवितांना मॉमनें वैवाहिक प्रेमाची खूपच टवाळी केली आहे. चोरटें प्रेम करणारा डॉक्टर ज्यावेळीं " मला एकट्यालाच नीतीची चाड आहे असें दिसतें " ('It appears that I am the only person with a moral sense') असें म्हणतो त्यावेळीं आपली खूपच करमणूक होते ! अखेर तो 'मी आज पॅरिसला येणार नाहीं' असा अँडाला फोन करतो. नाट्याच्या दृष्टीनें तिसरा अंक फिका वाटतो. आपल्या नवऱ्याचें प्रेम परत मिळाल्यानंतर तें कायम टिकावें यासाठीं पेनेलोप त्याला कशी खेळवीत असते हेंच या अंकांत दाखविलें आहे. अँडाला सर्व समजल्यावर ती डिकीला आपण या प्रेमाकडे कसें पहात होतों, तें सांगते : 'When my husband was away, it was convenient to have some one to do things for me' ('नवरा दूर असल्यावर थोडे तोंडीं लावणें नको का ?'). हें ऐकून डिकी सर्दच होतो. बार्लो व अँडा पॅरिसला जाण्याचें ठरवितात. प्रा. गोलाइटलीनें पेनेलोपला सांगितलेलें असतें, " नवरा मुठींत ठेवावयाचा असेल तर प्रेमाचा प्रकार वारंवार बदलला पाहिजे. त्याला आपण नव्या प्रेयसीचें प्रियाराधन करीत आहों, असें सतत वाटलें पाहिजे. " पेनेलोपचे विभ्रम चालूं असतात व अखेर डिकीच्या प्रियाराधनानें आपण जिंकलें गेलों आहोंत असें ती दाखविते.

दुय्यम पात्रांतहि मॉमचें स्वभावलेखनाचें कौशल्य दिसून येतें. साधारणतः प्राध्यापक व विशेषतः गणित, तत्त्वज्ञान अशा विषयांचा प्राध्यापक हा विनोदाचा विषय असतो. परंतु या नाटकांतील प्रा. गोलाइटली हा मात्र आयुष्याचें गणित बरोबर कसें सोडवावयाचें तें आपल्या मुलीला शिकवितो. त्याचीं कांहीं विधानें मोठी भेदक आहेत. तो पेनेलोपला म्हणतो : " डिकीची प्रेयसी सुंदर असेल तर मला विशेष भीति वाटत नाहीं. परंतु ती सामान्य असेल तर मात्र काळजी करण्यासारखी परिस्थिति आहे. सुंदर स्त्रीबद्दलचें आकर्षण हळुहळु कमी होतें. पण सामान्य स्त्रीवर प्रेम करणारा पुरुष मात्र खरोखरच प्रेमांत पडलेला असतो." बार्लोची व्यक्तिरेखाहि अतिशय कौशल्यानें चित्रित केलेली आहे.

बड्या मंडळींत वावरण्याची हौस असणारी व मेजवान्या, नृत्य इत्यादि गोष्टींना आयुष्याचें सर्वस्व मानणारीं पात्रें मॉमच्या अनेक पुस्तकांत आहेत. 'रेझर्स एज' मधील टॅपल्टन हा अशा तऱ्हेच्या व्यक्तिरेखेचा उत्कृष्ट नमुना आहे. 'पेनेलोप' या नाटकांत बार्लोच्या स्वभावछटा रंगवतांना मॉमनें खेळकर उपरोध वापरून या नाटकाला उठाव आणला आहे. नाटकांत एक मुख्य पात्र डॉक्टर असल्यामुळें डॉक्टरांचीहि थट्टा करण्याची संधि मॉमला मिळाली आहे. मिसेस् वॅट्सन्‌चा या दृष्टीनें कौशल्यपूर्ण उपयोग केला आहे. हिचा मृत पति डॉक्टर असतो व त्यामुळें कोणताहि डॉक्टर सल्ल्याबद्दल तिच्याकडून पैसे घेत नाहीं. त्यामुळें सर्व डॉक्टरांना आपली प्रकृति दाखविणें हा तिचा छंदच असतो. ती डिकीकडे येते. पैशाच्या अडचणींत असलेल्या डिकीला ही ब्याद टाळतां येत नाहीं. आपण काळजीपूर्वक सल्ला देत आहोंत हें दाखविण्यासाठीं तो तिला सांगतो : " पाव एका बाजूनें भाजा व एका बाजूनें तसाच ठेवा. भाजलेल्या बाजूला जॅम व दुसऱ्या बाजूला लोणी लावा व नंतरच खा. नीट लक्षांत ठेवा हं. उलट सुलट झालें तर प्रकृति आणखी बिघडवून घ्याल. "

स्त्रियांच्या कपड्यांच्या हौशीचीहि लेखक नेहमीं थट्टा करतात. परंतु या नाटकांतील नायिका मानसिक ताण सुसह्य करण्यासाठीं भारी कपडे विकत घेते. या घटनेंतील सूचकता हृद्य आहे. कोणत्याहि पुरुषाबरोबर







आयुष्य घालवावयाचें असेल तर स्त्रीला विलक्षण मानसिक ताण पडत असेल व त्यांतूनच ही छानछोकीची हौस निर्माण होत असेल ही सूचना पुरुषांना अस्वस्थ करणारी आहे.

जीवनांत फाजील गंभीरपणामुळें व रूढ भावनांमुळें आपण स्वतःला दुःखी करून घेतों, आपली विनोदबुद्धि कायम असली तर अनेक दुःखें सुसह्य होतील व जीवनांतील अनेक उत्पात टळतील असें मॉमला वाटते. डिकीच्या चोरट्या प्रेमसंबंधामुळें पेनेलोपला आपलें जीवन उद्ध्वस्त झालें आहे असें वाटतें. परंतु या घटनेंतून प्रा. गोलाइटलीच्या शहाणपणामुळें, शोकान्तिका होण्याऐवजीं एक हास्यकारक घटनाच निर्माण होते. मॉम हा हेतुप्रधान लेखक नाहीं. परंतु त्याच्या लिखाणांतील मिस्किल विनोदामागें एक जीवनदृष्टि आहे हें खास. 'पेनेलोप' या नाटकांत नाट्यपूर्ण घटना, कौशल्यानें चित्रित केलेल्या व्यक्तिरेखा, प्रसन्न वातावरण व मार्मिक उपरोध यांच्या द्वारा याच जीवनदृष्टीचा आविष्कार झालेला आहे, असें मला वाटतें.

---

## त्रिशङ्कु

युगायुगाचा मीच त्रिशङ्कु
अवकाशीं चिर वास मला
सदेह स्वर्गाला जाण्याचा
एक लागला ध्यास मला.

गूढ आपुल्या निळसर नयनें
खुणावितें आकाश मला
अटळ परंतु हे मातीचे
दृढतर, जडतम पाश मला – !

अंधारीं वा कधीं प्रकाशीं
अस्थिरतेंत निवास मला
अरुंद सीमारेषेवरतीं
नित्याचाच प्रवास मला.

नील प्रांगणीं भटकायाचा
भव्य असा हव्यास मला
परंतु अंतीं असे सेवणें
वैफल्याचा घास मला.

युगायुगाचा मीच त्रिशंकु
कोठेंही नच वास मला
सदेह स्वर्गाला जाण्याचा
एकच आहे ध्यास मला.

विश्वामित्राच्या विश्वावर
निरुपायें विश्वास मला
मृगजळांतल्या नवस्वर्गाचा
नित्यच होतो भास मला !

— प्रद्युम्न टंकसाली

## पाहुनि तिळतिळ तुटतें अंतर — !

दीप लागले चारि दिशांना
लाखों पणत्या त्या मांसाच्या
वाती अस्थींच्या त्यांमध्यें
स्नेहें जळताती रुधिराच्या !

भीषण ज्वाळा जिकडेतिकडे
बाणांसम जणुं प्रेतें जळतीं
कवटया फुटतां स्फोट ' बॉम्ब ' चे
कुबट धुराचीं वलयें अन्तीं ! —

आणि पहा, गर्जती चौघडे
पृष्ठ बडवितां बळें तयांचे
निघती त्यांतुन बोल परंतु
अगतिकतेचे कारुण्याचे !

' भूक, भूक ' रव निघे जेधवां
सनईचा तो मंजुळ नाद
पिळतां खुंटी कुणी बळानें
क्रंदुन मानवता दे साद !

थाटामध्यें अशा चालतें
' लक्ष्मीपूजन ' येथ निरंतर
हवन सारखें मानव्याचें
पाहुन तिळतिळ तुटतें अंतर !

— रमेश वाबगांवकर










तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# सत्यशोधकसमाज व ब्राह्मसमाज

'पुरातन धर्मसंस्थांनीं अनेक युगें प्रत्येक मानवसमाजाच्या भोवतीं भेदभावाची तटबंदी उभारली आहे. ती उडवून देऊन मानवी ऐक्याची स्थापना करावी अशा ध्येयानें नवयुगधर्माची चळवळ गेल्या शतकाच्या प्रारंभीं भारतांत निर्माण झाली. त्या चळवळीचे प्रथम पुरस्कर्ते बंगालचे महापुरुष राजा राममोहन रॉय होत. पश्चिम युरोपांत स्वातंत्र्य, समता व बन्धुभाव या नैतिक ध्येयांनीं प्रेरित झालेली राजकीय लोकसत्तावादी चळवळ यावेळीं सफल होण्याच्या मार्गांत होती. त्या चळवळीचा रोख सर्व मानवजातीला व्यापण्याकडे होता. परंतु परंपरागत धर्मसंस्थांच्या अभिमानानें मानवी एकतेची जाणीव आच्छादित झालेली होती. त्या अभिमानामुळें मुसलमान, ख्रिश्चन, हिंदु, इत्यादि भेदभाव अभेद्य ठरलेले होते. त्या अभिमानाला शिथिल करणाऱ्या उच्चतर व्यापक धर्माची गरज उत्पन्न झाली होती. धर्मभेदाची भावना मानवी ऐक्याच्या जाणीवेला स्तिमित करीत होती व मानवाच्या समान विकासाला अडथळे उत्पन्न करीत होती. कारण धर्मभावना कोणत्याहि इतर सामाजिक भावनांच्यापेक्षां गंभीर असते; तिची मुळें जीवनाच्या तळापर्यंत रुजलेलीं असतात. तिच्याशीं सगळया सुखदुःखांचा, आकांक्षांचा, कामनांचा किंबहुना जीवितसाफल्याचा संबंध निगडित असतो. म्हणून जेव्हां धर्मभेदाची भावना विश्वव्यापी लोकसत्तेला पायबंद घालू लागली तेव्हां लोकसत्तेला नवयुगधर्माच्या चळवळीची आवश्यकता उत्पन्न झाली.

### नवयुगधर्माची चळवळ

अशा नवयुगधर्माची चळवळ हिंदमध्यें १९ व्या शतकाच्या प्रारंभीं निर्माण झाली. **ब्राह्मसमाज** हें त्याच चळवळीचें एक रूप होय. कालान्तरानें १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत ही चळवळ महाराष्ट्रांत पसरूं लागली. **सत्यशोधकसमाज** हा तिचाच एक पर्याय होय.

जातिभेद, वर्णभेद, धर्मभेद व देशभेद यांच्याशीं तादात्म्य न पावतां मानवजात भ्रातृभावनेनें कशी नांदेल यावर या चळवळीचें लक्ष केंद्रित झालें होतें. ईश्वरभक्ति व मनुष्यांची नैतिक एकता यांचा मिलाफ हें सर्व धर्मांचें अबाधित रहस्य होय, या भावनेनें जगांतील सर्व धर्मांचे आपसांतील विरोध खण्डित करावे, असें तत्त्व राममोहन रॉय यांनी हिंदी व ख्रिस्ती जगापुढें प्रथम मांडलें.

सत्यशोधक-समाजातर्फे हेंच तत्त्व महाराष्ट्रांत प्रसृत करण्याचा प्रयत्न झाला. जोतीराव फुले यांनीं आपल्या अखंडांमध्यें ( अभंगांमध्यें ) या तत्त्वाची द्वाही फिरविली आहे. ते म्हणतात : " मानवांचे धर्म नसावे अनेक । निर्मीक तो एक जोती म्हणे ॥ मानवांचा धर्म एकच असावा । सत्यानें वर्तावा । जोती म्हणे ॥ मानवांचे साठीं बहुधर्म कसे । झाला कांहो पीसे । जोती म्हणे ॥ मानवांनो तुम्ही सत्यधर्मी व्हावें । ईशगुण गावे । जोती म्हणे ॥ सार्वभौम सत्य स्वतः आचरावें । सुखें वागवावें । पंगु लोकां ॥ "

ब्राह्मसमाजाचा आदर्शवाद पुढील श्लोकयुग्मांत सम्यक् सांगितला आहे :

सुविशालमिदं विश्वं पवित्रं ब्रह्ममन्दिरम् ।
चेतः सुनिर्मलं तीर्थं सत्यं शास्त्रमनश्वरम् ॥
विश्वासो धर्ममूलं हि प्रीतिः परमसाधनम् ।
स्वार्थनाशस्तु वैराग्यं ब्राह्मैरेवं प्रकीर्त्यते ॥

अर्थ :– हें खूप विशाल विश्व हेंच ईश्वराचें मंदिर, शुद्ध चित्त हेंच पुण्यक्षेत्र, सत्य हेंच शाश्वत धर्मशास्त्र, श्रद्धा हेंच धर्ममूल, प्रेम हेंच परमसाधन व स्वार्थनाश हेंच वैराग्य होय – असें ब्राह्मसमाजी सांगतात.

ब्राह्मसमाज व सत्यसमाज यांच्या स्थापनेच्या कालांत ४५ वर्षांचें अंतर आहे. ज्या सालीं जोतिबांचा जन्म झाला त्यानंतर एका वर्षानेंच १८२८ सालीं ब्राह्मसमाजाची स्थापना झाली. ब्राह्मसमाजाचा प्रसार बंगाल्यांतील पाश्चात्त्य उच्चविद्याविभूषितांच्या मध्येंच झाला हें जरी खरें असलें तरी ब्राह्म विचाराची माहिती त्या काळच्या हिंदी सुशिक्षित वर्गास चांगल्या प्रकारें झाली. तत्कालीन सुशिक्षित व जागृत हिंदूंच्या मधील निवडक मंडळींच्या

---

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं ' महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या चळवळीचा इतिहास ' लिहिला आहे. त्या हस्तलिखितांतील एक प्रकरण त्यांच्या संमतीनें येथें उद्धृत केलें आहे. — का. सं.

मनांतील विलक्षण खळबळ दाखविणारा हा विचार-प्रवाह होता. त्याचीं वैशिष्ट्यें नितांत नवीं होतीं. हिंदुधर्माच्या कर्मकाण्डाला, उपासनापद्धतीला वा आचार-धर्माला निर्मूल करण्याचा उद्देश या विचारप्रवाहांत भरला होता. हा विचारप्रवाह प्रवृत्त करणाऱ्या मूळ पुरुषांच्या ठिकाणीं वैचारिक श्रेष्ठतेचा आत्मविश्वास होता. जोतीबांना पुणें शहरांत राहिल्यामुळें या नव-शिक्षितांच्या विचाराची पूर्ण ओळख झाली होती. उत्सुकता व साशंकता अशा दोन्ही वृत्तींनीं त्यांनीं त्याच्यावर नजर फिरविली होती. परंतु ते ब्राह्मसमाजा-ला जाऊन मिळाले नाहींत. त्यांनीं आपला समाज अलग काढला.

## सत्यसमाज अलग कां जन्मला ?

सत्यशोधकसमाजाची अलग स्थापना न करतां जोतीबांनीं ब्राह्मधर्माचाच अंगीकार कां केला नाहीं, असा विचार अनेकवार मनांत आल्याशिवाय रहात नाहीं. ' सार्वजनिक सत्यधर्म ' या त्यांच्या पुस्तकांतील 'सत्यें' व ब्राह्म तत्त्वें यांच्यांत अनेक मौलिक साम्यें आहेत. ' सत्य ' या प्रकरणांतील सत्यवर्तनाचे तेहेतीस नियम प्रौढ व प्रसन्न शैलीनें मांडले तर तीं ब्राह्मसमाजाचीं तत्त्वें ठरतात. ब्राह्मसमाजाचीच प्रार्थना-समाज ही मुंबईतील शाखा होय. त्याची स्थापना इ. स. १८६७ सालीं मुंबई शहरांत झाली. सत्यसमाजाची स्थापना १८७३ मध्यें झाली. प्रार्थनासमाजाचे अनेक लहानमोठे कार्यकर्ते व सदस्य जोतीरावांचे मित्र वा सहकारी वा चहाते होते. कै. न्या. मू. महादेव गोविंद रानडे, डॉ. रा. गो. भांडारकर, वाळवेकर या मंडळींचा त्यांच्याशीं चांगला संबंध होता. सत्यशोधक समाजाच्या सुप्रसिद्ध झेंडामिरवणुकींत वाळवेकर, रानडे व भांडारकर सामील झाले होते. खिश्चन धर्म व खिस्तचरित्र यांचा उत्तम संस्कार जसा अनेक थोर ब्राह्म मंडळींवर झाला होता, तसा जोतीरावांवरहि झाला होता. श्री. केशवचन्द्र सेन यांनीं तर ब्राह्मसमाजास संपूर्ण खिश्चन दीक्षा देण्यापर्यंत मजल नेली होती, असें न्या. मू. रानडे यांच्या डॉ. भांडार-करांना लिहिलेल्या एका पत्रावरून निश्चित करतां येतें. तात्पर्य, अशा प्रकारें साम्य व सौहृद असूनहि जोती-रावांनीं ब्राह्मसमाजासच उचलून कां धरलें नाहीं ? परमार्थ-प्राप्तीस धर्मगुरूंची मध्यस्थी नको, धार्मिक विधि वा विवाहादि संस्कार करण्यास ब्राह्मणपुरोहिताची आवश्यकता नाहीं, मूर्तिपूजा धार्मिक अवनतीचें चिन्ह होय, कोणताहि धर्मग्रंथ संपूर्णपणें दैवी संदेश देण्यास समर्थ नाहीं, सर्व धर्म व धर्मग्रंथ मानव-प्रणीत आहेत, सर्व धर्मांत समान नैतिक तत्त्वें आहेत, परलोकांतील सद्गतीची चिंता न करतां याच जगांतील जीवितावर लक्ष्य ठेवावें, शुद्ध बुद्धि ठेवून निराकार, ईश्वराच्या चिंतनानें विवेकबुद्धि जागृत करून माणसानें प्रपंच नेटका करावा—इत्यादि धर्ममतें ब्राह्मसमाज व सत्य-समाज यांत अत्यन्त सारखींच असतांना जोतिरावांनीं ब्राह्मसमाजाचा पुरस्कार कां केला नाहीं ? सामाजिक सुधारणेसंबंधीं ब्राह्मसमाज व सत्यसमाज यांत मूलभूत फरक नाहीं. स्त्रीपुरुषांचे समान हक्क, एकपत्नीव्रत, जातिभेदनिरास, अस्पृश्यतानिवारण, स्त्रीदास्यविमोचन, सहभोजन, आन्तरजातीय विवाह, शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार, स्त्रीशिक्षण, व्यक्तिस्वातंत्र्य, मानवी समानतेचा हक्क, विचारस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य —या सर्व बाबींत दोन्ही समाजांचीं मतें समान होतीं. अशा स्थितींत जोतीरावांनीं ब्राह्मसमाजाच्या प्रसारास मदत कां केली नाहीं ?

या प्रश्नाचें उत्तर जोतीरावांच्या ' सत्सार ' भाग १ मध्यें मिळतें. नेहमींप्रमाणें हेंहि चोपडें त्यांनीं फार सडेतोड भाषेंत लिहिलें आहे, नव्हें, तुसडेपणाचा तो एक मासला आहे. यांतील उत्तर तात्त्विक दृष्ट्या मुळींच महत्त्वाचें नाहीं. परंतु त्यांतील वस्तुवादीपणा मात्र बिनतोड आहे.

## विचार व वर्तन यांत विसंगति

प्रार्थनासमाजाच्या बहुसंख्य सदस्यांचा सामाजिक जीवनक्रम जोतीरावांच्या सामाजिक सुधारणेच्या आकांक्षा किंवा अपेक्षा सफल करण्यास प्रतिकूल होता. त्या सदस्यां-चे विचार बदलले परंतु भावना नीट बदलल्या नाहींत. विचाराला धैर्याचा पाठिंबा नव्हता. त्यामुळें जुने संस्कार निस्तेज झाले नाहींत. भावना नव्या विचारांच्यापुढें नमल्या नाहींत. नव्या विचारांतून नवी गंभीर श्रद्धा निपजली नाहीं. वैचारिक भूमिका बदलली परंतु जन्मापासून तयार झालेले संस्कार वर्तनास अडथळा करीत. विचार व वर्तन यांच्यांत विसंगति आली.

पुष्कळसे प्रार्थनासमाजी दुहेरी जीवनक्रम चाल-वीत असत. घरांत एक व बाहेर दुसरा. जे ब्राह्म —

प्रार्थना – समाजाचे सभासद , प्रचारक व उपासक होते त्यांच्यांत प्राधान्यानें ब्राह्मणी संस्कृतीच्या अभिमानाला उदार नवीनतेमुळें आधुनिक सभ्यता आली होती एवढेंच. त्यांच्या नवविचारांत व खाजगी भावनेंत महदंतर होतें. त्यामुळें घरगुती राहणीवर नवविचारांचा पाहिजे तितका परिणाम झाला नव्हता. प्रार्थनामंदिरांत मूर्तिपूजा नव्हती; परंतु ही उणीव घरच्या मंगलमूर्तीच्या देव्हाऱ्यानें भरून काढलेली होती. षोडशोपचारी पूजेनें तो देव्हारा शोभित व सुगंधित झालेला असे. ब्राह्मण व ब्राह्मणेतर सदस्य समाजमंदिरांत सोवळें-ओवळें किंवा स्पर्शास्पर्श पाळीत नसत; परंतु पुष्कळांच्या घरांत मात्र अव्वल सोवळें पाळलें जात होतें. घराच्या उंबरठ्याच्या आंत सनातनी व समाजमंदिरांत सुधारक अशी दुटप्पी वृत्ति निष्ठेला बट्टा लावीत होती. त्यामुळें जोतीरावांचा उत्साहभंग झाला. त्यांना तिरस्कार उत्पन्न झाला.

## मागासलेल्यांबद्दल सहानुभूतीचा अभाव

मुख्यतः प्रार्थनासमाजांत पांढरपेशा प्रतिष्ठित सुखवस्तूंचा भरणा होता. काबाडकष्ट करणाऱ्या, मागासलेल्या, मलिन व खेडवळ समाजाची दुःस्थिति पाहून निजपणारी तळमळ वा त्वेष या मंडळींच्या वर्तनांत प्रतिबिंबित झालेला क्वचित् दिसे. युरोपियन शिष्टाचार, पाश्चात्य नोकझोक, आधुनिक अद्ययावत् भाषणपद्धतीचा नखरा, इस्त्रीचा लखलखीत पोषाक, घोड्यांच्या बगींत बसलेलीं झुळझुळीत वेषभूषेनें नटलेलीं स्वयंमन्य जोडपीं, इंग्रजी भाषेच्या संस्कारानें मातृभाषा गढूळ करून आपलें निराळेंपण दाखविण्याचा कृत्रिमपणा, हवाशीर प्रशस्त दिवाणखाना असलेल्या इमारतींतील उबदार, टवटवीत, नाजुक व भावुक गृहजीवन आणि खिश्चन प्रार्थनामंदिरांच्या पद्धतींचें उपरें अनुकरण व उथळ वृत्ति यांचा प्रार्थनासमाजीयांत अनुभव आला व त्यामुळें जोतीरावांना उद्वेग उत्पन्न झाला असल्यास नवल वाटण्याचें कारण नाहीं.

जोतीरावांना जी सामाजिक व धार्मिक सुधारणा पाहिजे होती तिचा गाभा भिन्न होता, तिच्याकरितां अत्यंत नाडलेल्या, पिटलेल्या, खुरटलेल्या व दैन्यपूर्ण झालेल्या जनांशीं एकरूपता अनुभवणारीं अंतःकरणें पाहिजे होतीं. भाषा ओबडधोबड, गांवठी वेष, लज्जारक्षणापुरते फाटकेतुटके कपडे, केवळ आसऱ्यापुरती कसलींतरी घरेंदारें, धुळीनें माखलेले पाय – असे जे सामान्य जन त्यांच्या विकासाचा निदिध्यास लागल्याची दर्शक दीक्षा प्रार्थनासमाज देत नाहीं, याची जोतीरावांस खात्री झाली. हीन बहुजनांत उच्च जीवनाची आशा कशी उत्पन्न होईल याची चिंता जोतीबांना लागली होती. प्रार्थनासमाजाचे मेळावे पाहून या लोकांच्या नवविचारांची व वर्तनाची सामान्यजनांच्या भवितव्याशीं सांगड घालणें जोतीरावांना दूरापास्त वाटलें.

## ब्राह्मसमाज टीकाप्रधान नव्हता

दुसरें असें कीं, ब्राह्मसमाजांत कोणत्याहि विद्यमान धर्मावर प्रत्यक्ष टीका करण्यास परवानगी नव्हती. या बद्दलची तक्रार जोतीरावांनीं 'सत्सार' या संवादात्मक लेखांत नोंदलेली आहे :

" यशवंतरावः– आर्यांच्या तावडींत सांपडलेल्या दिवसांपासून आर्यांनीं शूद्रादि अतिशूद्रांस बल-व-ज्ञानहीन करून धर्म शब्दाच्या आडून उपाध्या सारखे लागले आहेत. यास्तव भटब्राह्मणांनीं उपस्थित केलेल्या टोलेजंग समाजांत या त्यांच्या कृत्रिमी उपाधीविषयीं शूद्रांतील विद्वान् गोष्ट सुद्धां काढीत नाहींत हें कसें ?

तात्याः– त्या समाजाचे उत्पादक अट्टल मूर्तिपूजक. निव्वळ जाती-अभिमान मानून सोवळयांत असतां इंग्रजी पुस्तकाला स्पर्श न करणारे आर्य धूर्त होते. यास्तव त्यांनीं आपल्या धर्मरूपी उपाधीचा बचाव करण्याकरितां कोणी या समाजांत धर्मासंबंधीं बोलूं नये म्हणून समाजाचे चोपडींत हा नियम घुसडला आहे. "

सत्यशोधकास ब्राह्मणी आचारविचार व ब्राह्मणांचे धर्मग्रंथ यांच्यावर सडकून टीका करण्याची गरज भासत होती. ब्राह्म किंवा प्रार्थना समाज या विध्वंसक कामगिरीस हातभार लावण्यास तयार नव्हता. वस्तुतः जातिभेद, सोवळें-ओवळें, रोटीबंदी, स्पर्शास्पर्श व मूर्तिपूजा या गोष्टींवर विध्वंसक टीका करण्याची आवश्यकता होती. सत्यसमाजास ही आवश्यकता पटली होती. ब्राह्मणी धर्म व चालीरीति यांची नालस्ती व विडंबन करण्याचा विडाच सत्यसमाजानें उचलला होता. कारण ब्राह्मणी आचार हा सर्व हिंदूंचा आदर्श ठरला होता. म्हणून त्याला ब्राह्मणी परंपरेच्या दंभाचा परिस्फोट करावयाचा होता. त्याकरितां द्वेषाचा डोंब उठला तरी त्याची फिकीर नव्हती. ब्राह्म-प्रार्थना-समाजाच्या सभासदांत परंपरेशीं असा अटीतटीचा सामना करण्यास आवश्यक तितका त्वेष












नव्हता. जरी नवी वैचारिक दृष्टि प्राप्त झाली होती तरी जुन्याच्या विरुद्ध दंड थोपटून द्वंद्वयुद्ध करण्याची हिरीरी नव्हती. उलट सत्यसमाजाची स्थापनाच या हिरीरीनें झाली होती.

## शूद्रातिशूद्रांवरील अन्याय

ओबडधोबड युक्तिवादानें भरलेला 'सत्सार'—निबंध वरील परिस्थितीचा बरोबर आवांका घेऊन लिहिला आहे. ब्राह्म–प्रार्थना–समाजांतील कांहीं व्यक्ती सोडल्यास तो एकंदर समूह तत्त्वांकरितां संकटें सोसण्याऱ्यांचा नव्हता. पांढरपेशा समाजाला जी कौटुंबिक ज़ुजबी सुधारणा पाहिजे होती तेवढीच त्यांत होती. नैतिक निश्चयानें भरलेली, आपल्या तत्त्वांच्या पावित्र्याच्या बलाचा भरंवसा वाटून सामाजिक पुराण-मतवादावर बेधडक हल्ला करणारी व जुन्या पावित्र्याला वंचक पातक समजणारी श्रद्धा ब्राह्म–प्रार्थनासमाजीयांच्या ठिकाणीं क्वचित् आढळून येत होती. अशी श्रद्धा त्यांच्यांत असती तर जातिभेदाच्या विषमतेमुळें त्यांना परम विषाद वाटला असता व अस्पृश्यता हा घोर अन्याय आहे, अशी द्वाही दशदिशांना फिरवून त्यांनीं भारतीय समाज खडबडून जागा केला असता. साधी सदिच्छा म्हणजे खंबीर निश्चय नव्हे.

त्यामुळें जोतीरावांनीं चिडून जाऊन ब्राह्मसमाजीयांच्या कृतीची 'मानभावी, ब्रह्मकपट, ब्रह्मघोळ, छक्केपंजे' अशा शब्दांनीं संभावना केली. ते म्हणतात: "आतां आम्हाला ब्रह्मसमाज व प्रार्थनासमाज नकोत. आतां पुरे झाले तुमचे छक्केपंजे" ('सत्सार' पृ. ३). "शूद्रातिशूद्रांचा तुम्ही सर्वस्वीं नाश केला, हें आपण आपल्या डोळयांनीं पाहतां कां नाहीं बरें? या तुमच्या पूर्वजांनीं केलेल्या नीच कर्माचा मागमुद्दा नाहींसा व्हावा म्हणून तुम्हीं मांगाम्हारांस ज्ञान देऊन, त्यास तुम्ही योजून काढलेल्या समाजांत सरते करून घ्या. या कामीं आम्ही शूद्रांनीं तुम्हां आर्य ब्राह्मणांस मदत द्यावी ती कां? तुमच्या पूर्वजांनीं म्हारामांगांच्या मार्गांत पसरलेले कांटे तुमचे तुम्ही वेंचून काढा... आपण आपल्या समाजमंदिरांत हमेशा गच्च डोळे झांकून परब्रह्म–सनातन ब्रह्माची प्रार्थना करीत असून, तें तुम्हास मांगाम्हारांच्या पूर्वीच्या वास्तविक स्थितीविषयीं बोध करून तुमचे डोळे कां उघडीत नाहीं?" ('सत्सार', अंक १ पृ. ४, ५).

पहिल्या सुधारकांच्या अनुयायांत नवा विचार आला होता परंतु त्याला खोल श्रद्धेचें स्वरूप आलें नव्हतें. हृदयाला भिडणारी व जीवनाचा ठाव घेणारी श्रद्धा परिणत झाली नव्हती. कारण अनेकांच्या ठायीं सुधारणेची विचारसरणी आगंतुक कारणांनीं उत्पन्न होत होती. सुधारकांची विचारसरणी लोकजीवनाच्या गाभाऱ्यांतील शक्तीकरितां भुकेलेली नव्हती. सत्यसमाज ब्राह्मसमाजाहून तात्त्विक मतभेदामुळें वेगळा राहिला नाहीं. त्यांचें तत्त्व एकच होतें. परंतु ब्राह्मसमाजांत सुधारणेच्या लढाईस उद्युक्त करणारी तप्तता नव्हती. ती तशी असती तर सुशिक्षितांच्या श्रेष्ठ विद्यावैभवाची जोड मागासलेल्यांच्या चळवळीला मिळून तिची शक्ति व कार्यक्षमता वाढली असती.

## स्वामी दयानंदाचा केलेला सत्कार

वस्तुतः आर्यसमाज ब्रह्मसमाजापेक्षां सत्यसमाजापासून अनेक कारणास्तव दूर होता. आर्यसमाजाचे आद्य संस्थापक महर्षि दयानंद यांची कार्यपद्धति व विचारसरणी सत्यसमाजापेक्षां अगदीं भिन्न होती. आर्यसमाजाला वेद, संस्कृतभाषा, यज्ञ इत्यादि प्राचीन हिंदुधर्माच्या गोष्टी अत्यंत प्रिय; उलट, सत्यसमाजास या गोष्टींचें वावडें. तरी स्वामी दयानंदांचे पुण्यांत व महाराष्ट्रांत उत्साही स्वागत सत्यसमाजाच्या पुढाऱ्यांनीं केलें. कारण स्वामीजी व त्यांचे अनुयायी यांच्यांत सुधारणेच्या चळवळीच्या फैलावास लागणारा बाणेदारपणा व धडाडी होती. स्वामींजींची जातिभेदनिर्मूलन, अस्पृश्यतोच्छेद, स्त्रीशिक्षण, मूर्तिपूजाविरोध इत्यादि गोष्टींकरितां प्रचंड धडपड चाललेली उघड दिसत होती. त्याकरितां लागणारें शौर्य त्यांच्या ठायीं तळपत होतें. यतिवर्यांची प्रतिभा, वक्तृत्व, विद्वत्ता इत्यादिकांतील ओज लोकांना चकित करीत असे. भालेकर, जोतीराव इत्यादिकांना स्वामीजींची निष्ठा पटली. सुधारणेची प्राणप्रतिष्ठा करण्याची हिंमत त्या यतिवर्यांत आहे, अशी त्यांना खात्री पटली. असा यतिवर्य महाराष्ट्राला तेव्हां लाभला असता तर महाराष्ट्राच्या सामाजिक रचनेचा नूर पालटून गेला असता.

ब्राह्मसमाज व सत्यसमाज यांच्या तत्त्वांत पूर्ण साम्य दिसतें. तें त्यांनीं स्पष्ट रीतीनें मांडलेल्या उद्देशपत्रकांवरून सिद्ध होतें. परंतु कोणत्याहि चळवळी वा संघटना यांचे खरे उद्देश वा त्या उद्देशांचें साफल्य







त्यांच्या उद्देशविषयक जाहीरनाम्यांवरून सिद्ध करणें धोक्याचें असतें. अगोदर खरे उद्देश कोणते हें कळण्याकरितां कोणतीहि चळवळ वा संघटना प्रत्यक्ष कार्यक्रम कोणता अंगीकारते किंवा अमलांत आणते हेंच पहावें लागतें. साफल्याकरितां तो कार्यक्रम अमलांत आणण्यास आवश्यक अशी संपूर्ण त्यागाची दीक्षा घेतलेल्या लोकांची मोठी संख्या असावी लागते. त्या चळवळींत वा संघटनेंत सामील झालेले लोक साधारणपणें कोणत्या स्वभावाचे व प्रवृत्तीचे आहेत, त्यांचा नित्य जीवितक्रम कोणत्या खोल भावनांनी प्रेरिलेला असतो हेंहि तपासावें लागतें.

**ब्राह्मसमाज व सत्यसमाज यांतील भिन्नता**

खोलपणें पाहतां, ब्राह्मसमाज ही धार्मिक चळवळ होती व सत्यसमाज ही सामाजिक चळवळ होती, ह्याच निर्णयाला पोंचावें लागतें. वरील प्रकारचें 'सत्सारां'तील ब्राह्मसमाजाचें विदारण व दोषाविष्करण विनाकारण कठोर झालें आहे व परिस्थितीची प्रतिकूलता त्या टीकेंत ओळखलेली नाहीं, हें मात्र ध्यानांत धरलें पाहिजे. ब्राह्मसमाजांत प्रार्थना, ईश्वरभक्ति, सद्गुणकीर्तन आणि धार्मिक चिंतन यांना केंद्रस्थान होतें. ईशचिंतनानें चित्त पावन करून घेऊन साधेल तेवढी समाजसुधारणा मृदुपणें करावी व गृहस्थाश्रम नीटपणें चालवावा हाच ब्राह्मसमाजाचा मुख्य उद्देश होता. ब्रह्म व प्रार्थना या शब्दांनीं हा उद्देश स्पष्ट होतो. ब्राह्मसमाजांतील ईश्वरकीर्तन हिंदुधर्माच्या उच्च पातळींतील प्रतिपादनाशीं सुसंगत होतें. हिंदुधर्माच्या उच्चतम विचारसरणींत मूर्तिपूजा, व्रतवैकल्यें, कर्मकांड यांस गौण समजतात. आधुनिक हिंदु शिक्षितांनीं संस्कारून अलग काढलेलें हिंदुधर्माचें रहस्य प्रचारावयाची संस्था म्हणजे ब्राह्मसमाज होय.

स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, प्रौढविवाह इत्यादि कौटुंबिक सुधारणा आतां पांढरपेशा समाजानें बिनबोभाट मान्य केल्या आहेत. त्यामुळें समाजसुधारणेच्या दृष्टीनें ब्राह्मसमाजाचें कार्य संपलें आहे. त्यांना जातिभेद नष्ट करण्याचा कार्यक्रम मनापासून कधींच मान्य नव्हता. सारस्वत व कोंकणस्थ यांचे आपसांतले विवाह सुद्धां न केलेले बरे, अशी त्यांच्यांतल्या चांगल्या लोकांची पोटांतली भावना होती. त्यामुळें त्यांचें सामाजिक कार्य संपलें आहे.

सत्यसमाजांत ईश्वरोपासना व ब्रह्मचिंतन यास महत्त्व कधींच नव्हतें. अहंमन्य वरिष्ठांच्या विरुद्ध मागासलेल्या जमातींचें बंड उठविणें हाच उद्देश प्रामुख्यानें त्यांत होता. पहिले सत्यसमाजी ईश्वरोपासना चालवीत असत. परंतु वस्त्राला सुंदर रेशमी कांठ असावा एवढेंच तिचें माहात्म्य, अधिक नव्हे. ब्राह्मणी श्रेष्ठत्वाचें गमक असे धार्मिक विधि ब्राह्मण पुरोहितांवाचून चालवावयाचे म्हणून त्यांबद्दल फारशी आस्था नसतांना, त्यांनीं धार्मिक विधि जोरांत सुरू केले होते. केवळ ब्राह्मणांचें महत्त्व कमी करण्याकरितां ते सुरू केले. देवभक्ति नीतिधैर्याची साधक असते, हें तत्त्व जोतिरावांनीं मांडलें आहे, परंतु तें त्यांच्यापुरतेंच खरें ठरलें. धर्मग्रंथांतील ईश्वराच्या संज्ञा वगळून देवाला त्यांनी ' निर्मीक ' हें स्वप्रणीत नवें नांव दिलें. तें देवालाहि अपरिचित व भक्तांना कायमचें अपरिचित राहिलें यांत नवल कसलें ?

ब्राह्मसमाज ही हिंदुसमाजांतील वरच्या थरांची धार्मिक-सामाजिक सुधारणेची वैचारिक हांक होती, व सत्यसमाज ही सामाजिक मूल्यें बदलण्याबद्दलची खालच्या थरांची थरकांप भरविणारी त्वेषपूर्ण ललकारी होती. हे दोन आवाज एकांत एक संवादी स्वरांसारखे संमिलित झाले असते तर महाराष्ट्राच्या सामाजिक रचनेच्या पोटीं नवजीवनाची गर्भधारणा झाली असती, आज तिच्या प्रसूतिवेदनांचा मंगलसमय उगवला असता, ही भकास वांझोटी दुर्दशा कधींच संपली असती, गेल्या दीडशें वर्षांच्या सुधारणेच्या इतिहासांत यशाच्या सुंदर श्रेणींची परंपरा निर्माण झाली असती. ब्राह्मसमाजाला फार भव्य विद्यावैभवशाली दिगंत कीर्तीचीं माणसें लाभलीं. ब्राह्मसमाजाच्या कांहीं कर्त्या स्त्रीपुरुषांचें कर्तृत्व हें गेल्या शतकांतील भारतेतिहासाचें रमणीय लक्षण आहे. राजा राममोहन रॉय, केशवचंद्र सेन, देवेंद्रनाथ, सीतानाथ तत्त्वभूषण, रवींद्रनाथ टागोर, महादेव गोविंद रानडे, रामकृष्ण गोपाळ भांडारकर हीं मंडळी भारतीय इतिहासाच्या भांडारांतील तेजस्वी रत्नें आहेत. त्यांनीं केवळ ब्राह्मसमाजालाच भूषविलें नाहीं, सगळ्या भारताला त्यांनीं उज्वल केलें आहे. सत्यसमाजाला ब्राह्मसमाजाची ही परंपरा लाभली असती तर धार्मिक व सामाजिक चळवळी यशस्वी झाल्या असत्या. त्यांची सांगड ही ऐतिहासिक गरज होती. कारण सत्य हेंच परब्रह्म आहे.








श्री. एस्. आर्. डोंगरकेरी

# आंतरराष्ट्रीय विद्यापीठ-संघ

आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाची ( The International Universities Association ची ) स्थापना १९५० च्या डिसेंबरमध्यें झाली. ४ डिसेंबर १९५० सालीं नाइस ( Nice ) येथें एक जगांतील विद्यापीठांची आंतरराष्ट्रीय परिषद् ( International Universities Conference ) भरली होती. त्या परिषदेला जगांतील ५–६ देशांचे दोनशें प्रतिनिधि हजर होते. या परिषदेंतच आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाची स्थापना करावयाचें ठरून त्याची एक घटनाहि तयार केली गेली. आधुनिक काळीं वैज्ञानिक आणि यंत्रतंत्रविषयक शोधांनीं जी प्रगति घडून आली आहे तीमुळें आधुनिक समाजांत भौतिक आणि नैतिक असे महत्त्वाचे बदल झाले आहेत. हे महत्त्वाचे बदल लक्षांत घेऊन विद्यापीठांनीं त्यांना अनुरूप आणि सुसंगत असें आपलें कार्य आणि कर्तव्य निश्चित करण्याची व त्याकरितां जगांतील विद्यापीठांनीं परस्पर सहकार्य करून एक निश्चित कार्यक्रम आंखण्याची निकडीची गरज आहे. ही निकडीची गरज भागविण्याचा एक महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे त्यावेळीं स्थापन झालेला ' **आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघ** ' हा होय.

आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाची जी घटना मंजूर झाली त्याच घटनेनें या विद्यापीठसंघाचें नित्याचें कार्य करण्याकरितां दोन मंडळें निर्माण केलीं आहेत : ( १ ) पहिलें मंडळ म्हणजे आंतरराष्ट्रीय विद्यापीठकार्यालय ( International Universities Bureau ). हें कार्यालय किंवा ब्यूरो म्हणजे विद्यापीठसंघाची कायमची कचेरी ( Secretariat ) असून ती हल्लीं पॅरिस येथें आहे. संघाच्या घटनेनुसार या ब्यूरोचीं निर्दिष्ट केलेलीं कामें पुढीलप्रमाणें आहेत : विद्यापीठविषयक सर्व प्रकारचे प्रश्न – ज्याबद्दल आंतरराष्ट्रीय कुतूहल वा जिज्ञासा असेल–त्यासंबंधीं लेखी साहित्य जमवून तत्संबंधीं केन्द्र निर्माण करणें; भिन्नभिन्न विद्यापीठांमधील तौलनिक माहिती आंकडेवार गोळा करतांना, तुलनेचीं सर्वसाधारण तत्त्वें ठरवून तदनुसार आंकडेवार माहिती प्रसिद्ध करणें; भिन्नभिन्न विद्यापीठांमध्यें परस्परांत विद्यार्थी व अध्यापक यांचा ' विनिमय ' घडवून आणण्यास साहाय्य करणें; ग्रंथसंग्रह, प्रयोगशाळेची वैज्ञानिक उपकरणसामग्री, त्याचप्रमाणें विद्यापीठांतून होणाऱ्या संशोधनाला लागणारी साहित्यसामग्री या गोष्टींची विद्यापीठांतून परस्पर देवाण-घेवाण कशी होईल याबद्दल उपाययोजना करणें. ( २ ) दुसरें मंडळ म्हणजे विद्यापीठसंघाचें कार्यकारी मंडळ ( The Administrative Board ) हें होय. कार्यालयाच्या कामावर नेहमीं देखरेख ठेवणें आणि विद्यापीठांची पुढील सर्वसाधारण परिषद् भरेपर्यंत विद्यापीठसंघाचें कार्य करीत रहाणें हें कार्यकारी मंडळाचें काम होय. जगांतील विद्यापीठांची सर्वसाधारण परिषद् पांच वर्षांनीं भरवावयाची असें घटनेनें ठरलें असून त्याप्रमाणें पुढील आंतरराष्ट्रीय विद्यापीठ परिषद् १९५५ सालीं भरेल.

आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाचें कार्य जर यशस्वी व्हावयाचें असेल तर, जास्तींत जास्त विद्यापीठांनीं त्याचें सदस्य झालें पाहिजे. पदवी (degrees) देणारी, संस्कृति व ज्ञान यांच्या प्रसाराचें प्रमुख उद्दिष्ट असलेली, ज्ञानाची केवळ एकच शाखा नव्हे तर ज्ञानाच्या अनेक शाखांच्या अभ्यासाला उच्च शिक्षणाच्या पातळीवरून वाहिलेली अशी कोणतीहि संस्था विद्यापीठसंघाची सदस्य होऊं शकते. एखादी संस्था देत असलेल्या उच्च शिक्षणाची पातळी किती व कशी आहे हें ठरविण्यास, त्या संस्थेंत शिक्षण कोणत्या प्रतीचें दिलें जातें, त्या संस्थेंत प्रविष्ट होणाऱ्या विद्यार्थ्यांचें पूर्वशिक्षण किती अपेक्षिलें आहे, त्या संस्थेंत काम करणारा अध्यापकवर्ग कोणत्या शास्त्रीय व व्यासंगपूर्ण कार्यांत भाग घेत आहे, त्या अध्यापकवर्गाला तें कार्य करावयास साहित्यसामग्री किती व कशी उपलब्ध आहे या सर्व गोष्टी

श्री. डोंगरकेरी यांनीं मूळ लेख इंग्रजींत लिहिला असून त्याचा प्रस्तुत लेख हा अनुवाद आहे. — का. सं.








विचारांत घ्याव्या लागतील. अर्थात् या सर्व गोष्टींचा विचार करतांना आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाचें कार्यकारी मंडळ वाटल्यास एखादा अपवादहि करूं शकेल.

आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाच्या स्थापनेमुळें जगांतील विद्यापीठांना परस्परांशीं संबंध प्रस्थापित करतां येतील अशी अपेक्षा आहे. असे परस्परसंबंध प्रस्थापित झाल्यास विद्यापीठांना आपलें स्वतःचें कार्य तर अधिक कार्यक्षमतेनें करतां येईलच, त्याशिवाय जगांतील विचारवंत लोकांमध्यें परस्परांना समजून घेण्याची भावना त्यामुळें वाढीस लागेल. याखेरीज आणखीहि एक लाभ विद्यापीठसंघामुळें होऊं शकेल. विद्यापीठांसारख्या संस्थांचें अपेक्षित कार्य म्हणजे ज्ञानाचा निरपेक्ष एकनिष्ठ व्यासंग आणि संशोधन करीत राहणें, विचारस्वातंत्र्य आणि भाषणस्वातंत्र्य हीं अबाधित रहावींत म्हणून सतत जागरूक राहणें हें होय. हें कार्य करणाऱ्या विद्यापीठांनीं आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघांसारख्या संघटनेच्या व्यासपीठावर एकत्र येऊन आपल्या एकत्रित बळानें एकमुखी आवाज उठविल्यास, त्याकडे आदरपूर्वक लक्ष देणें जागतिक महत्त्वाच्या सभासंमेलनांतून जमणाऱ्यांना भागच पडेल.

आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाच्या घटनेच्या पूर्वभागांत संघाचीं तात्त्विक उद्दिष्टें स्पष्ट मांडलीं आहेत : ज्ञानाची ज्ञान म्हणून निरपेक्ष उपासना चालू ठेवून, सत्यसंशोधन करीत असतांना जें जें आढळून येईल त्याचा न कचरतां मागोवा घेत जाणें, भिन्न मतांबद्दल सहिष्णुता बाळगणें, आणि राजकीय हस्तक्षेपापासून मुक्त राहणें हीं तीं उद्दिष्टें होत. या उद्दिष्टानुसार प्रस्तुत विद्यापीठसंघाचा कोणत्याहि राजकीय संघटनेशीं कोणताहि संबंध नाहीं. संयुक्त राष्ट्रसंघटना किंवा यूनेस्को यांच्याशींहि संघाचा घटकसंबंध असा कोणताहि नाहीं. आरंभीं यूनेस्कोनें संघाचें तात्पुरतें कार्य सुरूं करण्याकरतां विद्यापीठसंघाला कांहीं द्रव्य-साहाय्य केलें खरें. परंतु विद्यापीठें सदस्य होऊन विद्यापीठसंघ एकदां अस्तित्वांत आल्यावर, सदस्यांकडून आलेल्या वर्गणीमधूनच प्रामुख्यानें संघाचें कार्य चालावें अशी योजना आहे.

आं० विद्यापीठसंघाच्या कार्यकारी मंडळा-( Administrative Board ) च्या आतांपर्यंत चार बैठकी झाल्या : पहिली नाइसला ९ डिसें १९५०, दुसरी इंग्लंडमध्यें केंब्रिजला १४ – १५ मार्च १९५१, तिसरी पॅरिसला ७ – ८ – ९ जानेवारी १९५२ आणि चौथी इटलींतील जिनोआला १६ – १७ एप्रिल १९५३. या मंडळाची पांचवी बैठक **ऑक्टोबर १९५४ मध्यें हार्वर्ड ( केंब्रिज, मॅसॅचुसेट्स ) येथें भरेल.** संघाचें धोरण काय असावें, सदस्य कोणत्या अटींवर करून घ्यावें, वर्गणीचे दर काय असावेत, संघाचे इतर आंतरराष्ट्रीय संस्थांशीं संबंध काय असावेत यांविषयीं त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय विद्यापीठकार्यालयाचा किंवा ब्यूरोचा कारभार, अंदाजपत्रक, पुढील कार्यक्रम वगैरेविषयीं निर्णय या बैठकींतून घेतले गेले. आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाच्या सदस्यांची संख्या हळुहळु वाढत आहे. १८ एप्रिल १९५३ रोजीं सदस्यांची संख्या १६९ होती. त्यांपैकीं विद्यापीठें आणि विद्यापीठासारख्या संस्था यांची सदस्यसंख्या १६६ असून, इतर तीन सदस्य म्हणजे संबद्ध संघच (associate member associations) आहेत. ते म्हणजे ब्रिटिश राष्ट्रकुटुंबांतील विद्यापीठांचा संघ, लॅटिन-अमेरिकेंतील विद्यापीठांचा संघ आणि रोमचा कॅथॉलिक विद्यापीठांचा संघ.

आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघानें युनेस्कोशीं घनिष्ठ संबंध जोडले असून, ' जागतिक आरोग्यसंघटना ' ( W. H. O. ), ' कौन्सिल ऑफ युरोप ' ' आंतरराष्ट्रीय प्राध्यापक-संघ ' ( International Association of University Professors and Lecturers ) इत्यादि जागतिक संघटनांशींहि संबंध प्रस्थापित केले आहेत. जगांतील विद्यापीठांतील वैद्यकीय शिक्षण देणाऱ्या शाखा व तत्तुल्य संस्था यांची एक जागतिक सूचि तयार करण्याचें काम जागतिक आरोग्यसंघटनेनें आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाकडे सोंपविलें आहे. त्याचप्रमाणें जगांतील निरनिराळीं विद्यापीठें यांच्याद्वारें ज्या निरनिराळया पदव्या (degrees) दिल्या जातात, त्यांतील कोणत्या परस्परांशीं सारख्या दर्जाच्या आहेत याचीहि (equivalence ची) अभ्यासपूर्वक माहिती आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघानें आंतरराष्ट्रीय प्राध्यापकसंघाच्या सहकार्यानें गोळा केली असून ती ग्रंथरूपानें लवकरच प्रकाशित होईल.

आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाच्या कार्यालया-( Bureau ) चें कार्य, माहिती जमा करून ती पुरविणें, संशोधन करणें आणि प्रकाशन करणें अशा प्रकारचें



अनुक्रमणिका








त्रिविध आहे. या ब्यूरोनें आपल्या पॅरिस येथील कचेरींत कागदपत्रांचें व पुस्तकांचें एक विशाल केंद्र निर्माण केलें असून त्याचें व्यवस्थित संवर्धन चालविलें आहे. या केंद्रांत चीन व सोव्हिएट रशिया सोडून जगांतील बाकीच्या विद्यापीठांची व उच्च शिक्षणसंस्थांचीं कॅलेंडरें, सांवत्सरिकें, अभ्यासक्रमपत्रिका, व कार्यालयानें वेळोंवेळीं पाठविलेल्या उत्तरपत्रिका यांचा संग्रह असून, त्याशिवाय जगांतील निरनिराळीं विद्यापीठें, त्यांचा इतिहास, त्यांचा कारभार, त्यांची घटना व सांपत्तिक स्थिति, त्यांनीं अवलंबिलेल्या शिक्षणपद्धती, त्यांच्या वास्तू व उपकरण-सामग्री या विविध गोष्टींसंबंधीं माहिती देणाऱ्या पुस्तकांचाहि प्रचंड संग्रह आहे. ज्यांना विद्यापीठविषयक संशोधन करावयाचें असेल त्यांना अशा तऱ्हेचें विविध साहित्य एकत्रित असें दुसरीकडे कोठेंहि सांपडणार नाहीं. म्हणून या कार्यालयांतील या पुस्तकसंग्रहाची उपयुक्तता विशेषच आहे. विद्यापीठांकडून किंवा उच्चशिक्षणविषयक प्रश्नांसंबंधीं आस्था बाळगणाऱ्या संघटना वा व्यक्ती यांच्याकडून कांहीं माहिती देण्याबद्दल विचारणा आल्यास, कार्यालयातर्फे ती माहिती पुरविली जाते. कार्यालयाच्या संशोधनशाखेनें 'जगांतील निरनिराळया विद्यापीठांतील समान दर्जाच्या पदव्या कोणत्या?' ('equ valences') या विषयाचा परिश्रमपूर्वक अभ्यास चालविला असून, त्या अभ्यासाची फलश्रुति 'Avenirs' या फ्रेंच नियतकालिकामध्यें प्रसिद्ध केली आहे. परराष्ट्रीय विद्यार्थी जास्तींत जास्त संख्येनें कोणत्या विद्यापीठाकडे आकृष्ट होतात, कोणकोणत्या देशांतून किती विद्यार्थी येतात, पदव्यांचा समान दर्जा ठरवितांना कोणकोणते करारमदार वा संकेत पाळले जातात, पदव्यांचा समान दर्जा ठरविण्याचीं सर्वसाधारण तत्त्वें कोणतीं इत्यादीसंबंधीं उद्बोधक माहिती वरील अभ्यासांतून मिळूं शकते. ही माहिती लवकरच ग्रंथरूपानें इंग्रजींतून व फ्रेंचमधून प्रसिद्ध होणार आहे. आंतरराष्ट्रीय प्राध्यापकसंघाचा एक अहवाल आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाच्या कार्यालयानें प्रसिद्ध केला असून त्यांत विद्यापीठांतील जे प्राध्यापक परदेशांत जाऊन शिकविण्यास तयार आहेत त्यांची यादी दिली आहे. कार्यालयातर्फे लवकरच एक त्रैमासिकपत्रिका प्रकाशित होणार असून, तीमधून विद्यापीठसंघाच्या विविध चळवळी, संघापुढील संकल्प, जगांतील निरनिराळ्या भागांतील विद्यापीठविषयक प्रश्न याविषयीं माहिती व चर्चा येणार आहे. त्याचप्रमाणें कांहीं प्रबंधहि प्रकाशित करावेत असाहि कार्यालयानें संकल्प केला आहे. उच्चशिक्षणांतील एखादा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न निवडून त्याच्या विविध बाजूंवर चर्चा करणारे तज्ज्ञांचे निबंध या प्रबंधांतून यावेत अशी ही योजना आहे. अशा प्रबंधाचा पहिला विषय 'आरोग्य आणि विद्यापीठ' असा नियुक्त केला असून दुसरा 'उच्च शिक्षणाची आर्थिक तरतूद' हा आहे.

आतांपर्यंत भारतांतील मुंबईविद्यापीठ, कलकत्ताविद्यापीठ व ओस्मानिआविद्यापीठ हीं तीन विद्यापीठें व पाकिस्तानांतील ढाका आणि पेशावर हीं दोन विद्यापीठें आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाचे सदस्य झालीं आहेत. ग्रेट ब्रिटनमधील १५ विद्यापीठें, युनायटेड स्टेट्समधील २० विद्यापीठें, आणि फ्रान्समधील १६ विद्यापीठें व १० इतर उच्चशिक्षणसंस्था हे आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाचे सदस्य आहेत हें लक्षांत घेतल्यास भारतांतील विद्यापीठांनीं आंतरराष्ट्रीय विद्यापीठसंघाचे अधिक संख्येनें सदस्य व्हावें अशी अपेक्षा आहे.

## 'चित्रमयजगत्'चा औद्योगिक विकास विशेषांक

**'चित्रमय जगत्' [संयोजक : त्र्यं. र. देवगिरीकर, संपादक : रा. प्र. कानिटकर, पुणें २]** या प्रसिद्ध मासिकानें गेला **जानेवारी १९५४ चा** म्हणजे आपल्या ४५ व्या वर्षाचा पहिला अंक **औद्योगिक विकास विशेषांक** काढला आहे. या अंकांत भारतांतील लोखंड, पोलाद, ॲल्युमिनियम, रासायनिक द्रव्यें, सायकली, शिवण्याचीं यंत्रें, आगपेट्या, साबण इत्यादींच्या उद्योगधंद्यांचा संक्षिप्त इतिहास, चालू परिस्थिति व पंचवार्षिक योजनेच्या संदर्भांत त्यांचें भविष्यकालीन चित्र यांची अत्यंत परिश्रमपूर्वक आंकडेवार माहिती दिली आहे. या अखिल भारतीय माहितीबरोबरच महाराष्ट्रांतील उद्योगधंद्यांची परिस्थिति, त्यांतील अडचणी या विषयींचा उद्बोधक ऊहापोह श्री. शं. वा. किर्लोस्कर, म. ल. डहाणूकर, वि. रा. वेलणकर इत्यादि महाराष्ट्रीय उद्योगपतींच्या लेखांतून आलेला आहे. आज भारताच्या सार्वत्रिक औद्योगीकरणाचा विचार विचारवंतांपुढें प्रामुख्यानें आहे. अशा वेळीं हा उद्बोधक व संग्राह्य औद्योगिक विकास विशेषांक काढून वाचकांस मार्गदर्शन केल्याबद्दल 'चित्रमयजगत्'च्या संपादकांचें मनःपूर्वक अभिनंदन.

# महायोगी अरविंद

बिहारचे राज्यपाल श्री. दिवाकर यांनीं नुकतेंच अरविंदांचें इंग्रजींत एक चरित्र लिहिलें आहे. पुस्तकाला 'महायोगी' असें नांव दिलें आहे तें अगदीं अनुरूपच आहे. बंगालनें गेल्या शंभर वर्षांत रामकृष्ण, रवीन्द्र आणि अरविन्द हे तीन अलौकिक महापुरुष जगाला दिले. तिघे आपापल्या क्षेत्रांत हिमालयाच्या शिखरासारखे आहेत.

अरविंदांचा जन्म बापूंच्यानंतर तीन वर्षांनीं झाला. आणि त्यांचा मृत्युहि बापूंच्या तीन वर्षानंतर झाला. बापूंनीं 'कर्मी अकर्म' सिद्ध केलें. अरविन्दांनीं 'अकर्मीं कर्म' सिद्ध केलें. दोघांनीं मिळून जणूं गीता पूर्ण केली. दोघे गीतापुत्र होत.

अरविन्द ४० वर्षें सतत एका जागीं चिकटून राहिले. थोरामोठ्यांनीं त्यांना बाहेर खेंचून आणण्याचा प्रयत्न केला. पण त्यांनीं त्याला दाद दिली नाहीं. या त्यांच्या एकाग्रतेचें कित्येकांना आश्चर्य वाटतें. पण ४० वर्षेंच काय, सबंध जन्म आवडीनें पतकरलेल्या संसाराच्या चाकोरींत घालविणारे लोक आपण पहात आहोंत. त्यांच्यापेक्षां अरविन्दांची एकाग्रता काय जास्त होती ? मला तर वाटतें अरविन्दांची एकाग्रता यांच्या पासंगालाहि पुरणार नाहीं. आश्चर्य करायचें आहे अरविन्दांनीं एकाग्रतेसाठीं जो विषय निवडला त्याचें.

पण मला तर त्याचेंहि आश्चर्य वाटत नाहीं. अमृताची चव ज्याला कळली तो त्याच्या सेवनांत मग्न झाला तर त्यांत आश्चर्य काय ? आश्चर्य तर याचें आहे कीं, ज्या तुच्छ सुखाचा मार्ग पुढें आणि मध्यें अनंत यातना लागलेला आहे, त्यांतच आम्ही कसे एकाग्र झालों आहोंत, आणि त्यांतच आम्हांला कशी गोडी वाटत आहे ! अमृताची गोडी चाखण्यांत जो तन्मय झाला त्याचें आश्चर्य कांहींच नाहीं. अमृताच्या गोडीचाच तो महिमा ठरणार.

पण अरविन्दांच्या बाबतींत विशेष आश्चर्य हेंच आहे कीं अमृताची ती अपार गोडी चाखत असतांना आम्हां दीन जनांचें विस्मरण त्यांना झालें नाहीं. साधारणतः ज्याला आत्मदर्शन लाभलें त्याची वाणीच खुंटायची. परंतु अरविन्दांची वाणी खुंटली नाहीं. ती पल्लवित झाली. तिला नवीन नवीन कोंब फुटले; आणि कमीजास्त अधिकाराच्या सर्व साधकांसाठीं त्यांनीं भरपूर पाथेय निर्माण केलें ...

वात्सल्य राखून आत्मदर्शनाचा मार्ग अरविंद जगाला दाखवीत राहिले एवढीच त्यांची विशेषता नाहीं ! आत्मदर्शन ही शेवटची पायरी न समजतां पहिली पायरी समजून तिच्या आधारावर त्यांनीं एक नवीन, गगनचुंबी म्हणूं कीं भूमिस्पर्शी म्हणूं, दर्शन रचलें. आजचें आमचें सारें जीवन मनोवृत्तींवर उभारलेलें आहे. त्याऐवजीं अतिमानस अथवा उन्मनी भूमिकेवर सारें जीवन रचायचें आणि जीवनांतील यच्चयावत् शाखोपशाखांवर उन्मनीच्या अमृताची वर्षा करायची असा त्यांनीं घाट घातला आणि त्यासाठीं सतत चाळीस वर्षें चिंतन, मनन आणि प्रयोग केले. कुणी म्हणतात, या कामीं त्यांना कांहीं यशहि आलें. कुणी म्हणतात, या उद्योगांत ते अयशस्वी ठरले. ही दुसरी गोष्ट गृहीत धरली तरी अरविंदांच्या प्रयत्नाला आणि योग्यतेला कमीपणा येत नाहीं. ती कल्पनाच एवढी उंच आहे कीं तिच्यासाठीं झगडून अयशस्वी झालेलाहि विजयी वीर म्हटला पाहिजे. ज्ञानदेवांच्या अभंगांत 'दिव्य देह अमृतकळा' इत्यादि देहाच्या दिव्य रूपांतराची भाषा ऐकूं येते. आणि

'अवघाचि संसार सुखाचा करीन ।
आनंदें भरीन तिन्ही लोक ॥'

अशी प्रतिज्ञाहि दिसून पडते. तत्सदृश अरविन्दांची ही कल्पना दिसते. अरविन्दांचा देह शेवटीं रोगानें पडला ही मात्र एक अनपेक्षित घटना झालेली आहे. दिवाकर लिहितात : "दुर्दैवानें त्यांचा देह शेवटीं मूत्राशयाच्या रोगानें पीडित झाला. बराच काळ त्याचा प्रतिकार करून त्यांनीं त्यांस आटोक्यांतहि ठेविलें. पण अखेरीस कोणत्या कारणामुळें त्यांचें त्यांनाच माहित, त्यांनीं त्या रोगाला देह सोंपवून दिला". पण कारण सांगतां येत नाहीं, ही गोष्ट वेदान्ती कधींच कबूल करायचा नाहीं. त्याच्यापाशीं दरेक गोष्टीचें कारण तयारच असणार. "प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः" अशी शकल यांसाठीं वेदान्त्यांनीं काढली आहे. — **आचार्य विनोबा**, '**सेवक**' जानेवारी अंकावरून.








श्री. श्रीराम

# वाचनसुलभतेचें मापन

फार प्राचीन काळीं मनुष्याची रहाणी अगदीं साधी होती. अशा साध्या राहाणींत मनुष्याचे विचारहि आचारांप्रमाणें साधेच असत. जीवनाच्या प्राथमिक गरजांसंबंधीं एकमेकांशीं विचारांची देवघेव करणें एव्हढ्याचीच त्या काळीं जरूरी भासत असे. अशा प्रकारच्या उपयोगासाठीं भाषासुद्धां अगदीं सोपी व मर्यादित असली तरी पुरेशी होत असे. यानंतर लेखन-कला उदयास आली. अर्थात लेखनकलेच्या मागोमाग वाचनकला उदयास आली.

यापुढची पायरी म्हणजे अनेक विद्या व कलांची वाढ झाली व शास्त्रेंहि उदयास आलीं. या सर्व घटनांचा परिणाम भाषेवर झाला. भाषा लालित्यपूर्ण आणि समृद्ध झाली. पण या बरोबरच भाषेंत क्लिष्ट शब्द आणि शब्दसमुच्चय यांचाहि भरणा झाला. विद्या, कला आणि विशेषतः शास्त्रांच्या वाढीबरोबर पारिभाषिक शब्दांचीहि वाढ झाली. आतां अशी परिस्थिति निर्माण झाली आहे कीं भाषेच्या आवांक्याबाहेर जाणाऱ्या क्लिष्टतेकडे मुद्दाम लक्ष वेधण्याची आवश्यकता वाटते.

आपले विचार लेखनाच्या द्वारें वाचकांस समजावून सांगणें, असा लेखनाचा मूलभूत उद्देश असतो. लेखनांत प्रतिपादन करावयाच्या विषयाप्रमाणें लेखाची भाषा बदलते. विषय कठीण असेल तर लेखांत पारिभाषिक शब्द इत्यादींचा भरणा जास्त असतो. शास्त्रीय लेखांचे विषय, त्यांतील विचार व माहिती पुष्कळवेळां वाचकांस अपरिचित असते. शास्त्रीय विषयामुळें अशा लेखांत कमीअधिक प्रमाणांत पारिभाषिक शब्द येणें अपरिहार्य असतें. शिवाय, शास्त्रीय लेखन वस्तुस्थितीस धरून असलें पाहिजे व त्याची भाषा अचूक असली पाहिजे असें बंधन त्यावर असतें. या सर्व अडचणींना तोंड देऊन शास्त्रीय लेखन सुलभ आणि रंजक करणें अवघड आहे. परंतु अशा लेखासच भाषा सुलभ असण्याची अत्यंत जरूर आहे. प्रतिपाद्य विषय नवीन व कठीण असल्यानें त्यांतच जर वाचण्यास कठीण व दुर्बोध भाषेची भर पडली तर अशा लेखांस वाचक मिळणें कठीण होईल. एखादा मजकूर समजण्याच्या आधीं, तो सहज वाचतां येणें आवश्यक आहे. समजा, या मजकुरांत लांबच लांब वाक्यें आहेत. अशा वाक्यांच्या वेगवेगळ्या भागांचा परस्पर संबंध समजण्यासाठीं तीं कधींकधीं दोनतीनदां वाचावीं लागतात. असें झाल्यास त्या लेखांतील स्वारस्य तावडतोब कमी होतें. वाक्यांत लांब लांब शब्द असले तरी देखील असाच परिणाम होतो.

कोणत्याहि प्रकारच्या लेखांत वाचनसुलभता असली पाहिजे हें खरें. पण ही वाचनसुलभता ठरवावयाची कशी ? ही मोजण्यासाठीं कांहीं साधन आहे का ? शास्त्रज्ञांना कोणच्याहि गुणाचें अचूक मापन केल्याशिवाय चैन पडत नाहीं. अचूक मापन करणें हा भौतिक शास्त्रांतील एक महत्त्वाचा भाग आहे. शास्त्रज्ञांचा असा प्रयत्न नेहमीच पूर्णपणें सफळ होतो असें नाहीं. पण असा प्रयत्न करणें व त्याच्यासाठीं वापरावयाच्या साधनांत पुनःपुन्हा सुधारणा करणें हा संशोधनाचा एक भागच आहे.

एखादा लेख वाचण्यास किती सोपा आहे तें मोजण्यासाठीं फ्लेश[1] नांवाच्या एका शास्त्रज्ञानें एक समीकरण बसविलें आहे, तें असें:

$$N = 206{\cdot}835 - 1{\cdot}015\,W - 0{\cdot}864S$$

वरील समीकरणांत

N म्हणजे 'वाचनसुलभते'चा निर्देशांक

W म्हणजे एका वाक्यांतील शब्दांची संख्या

S म्हणजे दर शंभर शब्दांतील सिलेबल्सची किंवा उच्चार-घटकांची संख्या

या समीकरणाचा उपयोग करून एक पुढील कोष्टक तयार केलें आहे.

| लेखाचें अथवा पुस्तकाचें नांव | 'वाचनसुलभते'चा निर्देशांक |
|---|---|
| प्राथमिक इंग्रजी क्रमिक पुस्तक | ९७·५ |
| 'रीडर्स डायजेस्ट' | ५६ |
| 'सायन्स डायजेस्ट' | ४६·७ |
| 'मायक्रोब हंटर्स' | ५२ |

1. R. Flesch, 'The Art of Readable Writing' (1949), Harper and Bros, New Yark.








यांपैकीं पहिले दोन निर्देशांक फ्लेश यांच्या लेखांतून घेतले आहेत. प्रस्तुत लेखांत सामान्य वाचकांसाठीं लिहिलेल्या शास्त्रीय वाङ्मयाचा विचार करावयाचा आहे. या साठीं 'सायन्स डायजेस्ट' हें सुप्रसिद्ध मासिक आणि श्री. पॉल डी. क्रुफ यांचें 'मायक्रोब हंटर्स' हें अत्युत्कृष्ट पुस्तक यांचा वरील समीकरणाच्या मदतीनें निर्देशांक काढून त्यांचा वरील कोष्टकांत तुलनेसाठीं समावेश केला आहे.

मराठी भाषेची मोडणी इंग्लिशपेक्षां वेगळी असल्यानें मराठीच्या उपयोगासाठीं वरील समीकरणांत बदल करावा लागेल. हें बदललेलें समीकरण असें होईल :

सु = २९० – श – ०·८६४ घ

वरील समीकरणांत

सु म्हणजे 'वाचनसुलभते'चा निर्देशांक

श म्हणजे एका वाक्यांतील शब्दांची संख्या

घ म्हणजे दर शंभर शब्दांतील उच्चारघटकांची संख्या

मराठींत शास्त्रीय वाङ्मय फार थोडें आहे. वरील समीकरणाचा उपयोग करून कांहीं मराठी शास्त्रीय लेख व पुस्तकें यांचा निर्देशांक पुढील कोष्टकांत काढून दाखविला आहे.

| लेखाचें किंवा पुस्तकाचें नांव | 'वाचनसुलभतेचा' निर्देशांक |
|---|---|
| उंदीर-नवरा ( बालवाङ्मयमाला ) | १९ |
| अभिनव विज्ञान-रसायन ( शास्त्रविषयासाठी क्रमिक पुस्तक ) | ५५ |
| रबर ( स्वाध्यायमाला ) | ५१ |
| 'योजकस्तत्र दुर्लभः' ('चित्रमय जगत्') | ५६ |
| 'फोरामिनी फेरा' अथवा छिद्रकाय, एक सूक्ष्म एकपेशीय प्राणी ('सृष्टिज्ञान') | ४१ |

वाचनसुलभतेचा निर्देशांक जितका अधिक तितकें चांगलें हें सांगावयास नकोच. अतिशय सोपी मराठी भाषा म्हणून तुलनेसाठीं 'उंदीर-नवरा' याचा अंतर्भाव वरील कोष्टकांत केला आहे. 'अभिनव विज्ञान-रसायन' हें शाळेतील ९, १० व ११ या इयत्तांसाठीं क्रमिक पुस्तक म्हणून नेमलेलें आहे. या पुस्तकाच्या निर्देशांकाचा तुलनेसाठी चांगला उपयोग होईल. वरील कोष्टकावरून एक निष्कर्ष ठोकळमानानें असा काढतां येईल कीं सामान्य वाचकांसाठीं लिहिलेल्या शास्त्रीय लेखांचा वाचनसुलभतेचा निर्देशांक ५० किंवा त्यापेक्षां जास्त असावा. जिज्ञासू वाचकांनीं इतर शास्त्रीय लेखांचे निर्देशांक काढून पहावे.

या ठिकाणीं एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. एखादा लेख वाचण्यास सुलभ असला तर तो समजण्यास सोपा असेलच असें नाहीं. शास्त्रीय वाङ्मय नुसतें वाचण्यासच नव्हे तर समजण्यास व ग्रहण करण्यासहि सोपें असलें पाहिजे. या दुसऱ्या गुणासाठीं एखादा निर्देशांक ठरविणें अजून शक्य झालेलें नाहीं. ती एक कठीण समस्या आहे. एखाद्या लेखनाचा वाचनसुलभतेचा निर्देशांक मोठा असेल; पण दुर्बोध वाक्यरचना व कठीण पारिभाषिक शब्द यामुळें तें समजण्यास कठीण होऊं शकेल. यास मध्यप्रांतांतील सरकारी निवेदनांत पुष्कळ उदाहरणें सांपडतील.

श्री. माधवराव बागल

# बाबुराव पेंटर यांचें वैशिष्ट्य

नुकतेच दिवंगत झालेले **श्री. बाबूराव पेंटर** यांना महाराष्ट्रांत कला-महर्षि म्हणून बरीच प्रसिद्धि मिळाली आहे. त्यांच्या एका चित्रपटाचा वेंब्लेमध्यें गौरव झाल्यामुळें आम्ही कांहीं मंडळींनीं कोल्हापुरांत त्यांना मानपत्र-समारंभ-प्रसंगीं कला-महर्षि म्हणून संबोधलें व त्यावेळेपासून त्याचनांवानें त्यांचा पुढें उल्लेख करण्यांत येऊं लागला.

चित्रपटानें त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. त्यानंतर त्यांच्या इतर गुणांकडे सामान्यांचें लक्ष गेलें व बाबूराव पेंटिंगहि करू शकतात, शिल्पकृतीहि तयार करू शकतात हें समजूं शकलें.

त्यापूर्वीं आनंदराव मेस्त्री व बाबुराव पेंटर हे दोघे



अनुक्रमणिका






परस्पर सहकार्यानें नाटकांतील पडदे रंगवीत आणि ते इतरांहून फार सरस ठरत.

चित्रपट तयार करण्याची व त्यासाठी कॅमेरा तयार करण्याची प्राथमिक धडपडहि या दोघांनीच केली, आनंदरावांच्या निधनामुळें बाबुराव हीच व्यक्ति लोकांसमोर उठून दिसूं लागली. कारण त्यावेळीं चित्रपटसृष्टींत दुसरी कोणीहि व्यक्ति डोळ्यांत भरण्याजोगी लोकांपुढें नव्हती. भारतांत सुद्धा फाळक्यांच्यानंतर बाबुरावांचेंच नांव घ्यावें लागे.

मी सुद्धा जो त्यांचेजवळ गेलों तो महाराष्ट्र फिल्म कंपनीमुळेंच. अन् आंत पाऊल टाकल्यानंतरच त्यांची पेंटिंग्ज् दृष्टीस पडलीं. त्यावेळेपासून तों या वेळेपर्यंत म्हणजे तीन तपांच्या कालांत बाबुरावांच्या कलेचा मला अभ्यास करतां आला, अंगे-उपांगें न्याहाळता आली व चिकित्सक दृष्टीनें त्यांच्या गुणावगुणांची छाननी करतां आली.

बाबुरावांनी कलेचें शिक्षण घेतलें नव्हतें या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. शालेय शिक्षण घेतलें नव्हतें एवढेंच. पण जन्मापासूनच त्यांना शिल्पकलेचे आणि चित्रकलेचे धडे मिळत होते. त्यांचे वडील हे मेहनती कारागीर होते. ते पेंटिंग्ज करीत तसे दगडाच्या मूर्ती तयार करीत आणि खोदीत. हस्तिदंती कोरीव कामेंहि त्यांना करता येत. पण साऱ्या कलेचा वाण जिनगरी. बाबुरावाच्याकडूनहि ते तीं कामें आपल्या देखरेखीखालीं करून घेत. फोटो एन्लार्जमेंट्स करून घेत, कोरीव कामेंहि करून घेत. समोर माणूस बसवून त्याचें पेंटिंग करणें हें त्या काळीं नसे. फोटो घ्यायचा. त्याला घरें पाडायचीं. मापून मोठ्या आकारांत त्याची नक्कल करायची. बाबुरावांना याच सांच्यांतून काम करावें लागल्यामुळें फोटोग्राफीची छाप त्यांच्या पेंटिंगवर जी पडली ती अखेरपर्यंत निघाली नाहीं. फोटोग्राफींत निसर्गाचें रंगवैचित्र्य मिळूं शकत नाहीं व नको ते बारीक सारीक 'डीटेल्स' येतात. निसर्गातला ताजेपणा, जिवंतपणा, भावना फोटोंत सांपडत नाहींत. चित्रकाराच्या मनावर होणारे परिणाम यंत्रांतून येत नाहींत. बाबुरावांनीं अगदी उतारवय होईपर्यंत पोर्टेटला फोटो हेंच साधन वापरल्यामुळें त्यांतले दोष त्यांच्या पेंटिंगमध्यें अखेरपर्यंत राहिले. याचमुळें त्यांच्या पोर्टेट्समध्यें फोटोग्राफिक फिनिशिंग आढळतें. रंगाच्या विविधतेऐवजीं एकाच रंगतांला चढउतार दिसतो. यामुळें उत्कृष्ट 'लाइकनेस' जमूनहि पेंटिंग रूक्ष वाटतें. तें रंगीत फोटोग्राफ असल्याप्रमाणें वाटतें. आधुनिक चित्रकारांना वरील गुण दिसले तरी आउटलाइनच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष केल्यामुळें पेंटिंग उत्कृष्ट पण ओळख मात्र पटत नाहीं असें होतें. हा दोष बाबुरावांच्या चित्रांत कधींहि दिसून येणार नाहीं. पण बारीकसारीक कामाच्या अतिरेकामुळें बाबुरावांच्या पेंटिंगमध्यें अचूक ओळख पटूनही कलेच्या दृष्टीनें ते पेंटिंग खालच्या दर्जात जात असे.

बाबुरावांच्या अपुऱ्या पेंटिंगमध्यें जी गोडी येई ती पुरें केलेल्यांमध्यें नसे म्हणून मी मला हवी तीं एकदोन पेंटिंग्ज् त्यांना अपुरी वाटत असतांनाच उचलून आणलीं. त्यांची पुरी पेंटिंग्ज् हिणकस आणि अपुरीच सरस ठरत.

उत्कृष्ट नक्कल करण्यांत मात्र बाबुरावांचा हात महाराष्ट्रांत कोणी धरणार नाहीं. यामुळें चित्रपटांतील प्रसंगाची पोस्टर्स ही अप्रतिम ठरत. तें १९२० साल असेल. बाबुरावांनीं रंगवलेलें एक पोस्टर पाहून सर जे. जे. स्कूल ऑफ् आर्टचे त्यावेळचे प्रिन्सिपॉल ग्लॅडस्टन सालोमन हे त्यांचेवर अगदी खूष झाले होते व बाबुरावांना त्यांनीं मुद्दाम बोलावून घेतलें होतें.

कल्पित चित्रें ( कांपोझिशन्स ) बाबुरावांनी कांहीं काढलीं. पण लक्ष्मी, सरस्वती, दत्तात्रय या चित्रांपलीकडे त्यांची क्वचितच मजल गेली. या कलेंत त्यांनीं कांहीं भर घातली नाहीं. खालच्या समाजजीवनाचें त्यांचें एकहि चित्र मी पाहिलें नाही व त्यांना काढावें असेंहि वाटलं नाहीं.

अलीकडे अलीकडे केवळ अभ्यासासाठीं बाबुराव मॉडेलवरून पेंटिंग्ज काढत. पण विक्रीसाठीच पेंटिंग काढण्याच्या दृष्टीमुळें त्यांच्या कलेंत प्रतिभेला तसा वाव मिळाला नाहीं. बाबुराव एक धंदा म्हणूनच कलेकडे पहात. त्यामुळें कलेंतहि धंदेवाईक दृष्टि व तंत्र त्यांनी स्वीकारलें. आबालाल रहिमान कलेसाठी वेडे होत, ध्येयासाठी जगत. जगण्यासाठी त्यांनी कला स्वीकारली नाहीं. दोघेहि अहर्निश राबत. पण कलेकडे पाहणाऱ्या प्रत्येकाचा दृष्टिकोण निराळा ! त्याचा साहजिकच परिणाम त्यांच्या कलेवर झाला.

पण 'सावकारी पाश' या चित्रपटांत मात्र बाबुरावांनीं खालचें पीडितांचें जीवन दाखवण्याचा प्रयत्न केला. त्या एका चित्रपटानेंच बाबुराव अमर झाले.








सैरंध्री, सिंहगड, कल्याणखजिना तंत्रदृष्ट्या फारच वरच्या दर्जाचे ठरतील. 'सावकारी पाश'नें त्यांच्याहातून जी समाजसेवा घडली ती मला अत्यंत महत्त्वाची वाटते. त्यांचें इतर मूक चित्रपट, दिग्दर्शकांना तंत्र म्हणून मार्गदर्शकच ठरतील. बोलपट त्यात्या भाषेच्या प्रांतांतच यशस्वी होऊ शकतो पण उत्कृष्ट मूकपट जगाच्या कोनाकोपऱ्यांत आपला संदेश पोचवूं शकतो. किती वर्षे होऊन गेलीं पण ते मूकपट माझ्या आठवणींतून अद्याप जात नाहींत.

बाबुरावांच्या अखेरच्या कालांत त्यांच्या हातून कांहीं शिल्पकृती बाहेर पडल्या पण त्या सर्वांत महात्मा गांधींचा उभारला जाणारा अतिभव्य पुतळा ही कृति सर्वोत्कृष्ट ठरेल. त्यांच्या सर्व शिल्पकृतींत ही उच्च दर्जाची ठरेल.

या पुतळ्याची ऑर्डर बाबुरावांना देण्यांत माझा बराचसा भाग असल्यामुळें व त्यांनीं ही ऑर्डर वेळीं पुरी न केल्यामुळें बाबुरावांच्यावर मला पत्रांतूनहि टीका करावी लागली. मी रागानें म्हणे : " बाबुराव तुमच्या आमच्या हयातींत हा पुतळा पाहण्याचें भाग्य लाभणार आहे कीं नाहीं ? " बाबुरावांच्या हातून अखेर पुतळा तयार झाला पण तो त्या ठिकाणीं बसल्याचें त्यांना पाहतां आलें नाहीं ! बाबुराव गेल्यापासून तो पुतळा बसलेला केव्हां पाहीन असें मला झालें आहे. तो डोळाभर पाहून डोळे मिटले तर जीवनांतील एक मोठें कार्य पार पडल्याचें समाधान वाटेल.

---

## साध्य आणि साधनें

आज जगाला ज्या गोष्टींना तोंड द्यावें लागत आहे, त्या कांहीं विलक्षणच, अडचणीच्या आणि संकटमय आहेत. आज जानेवारी २३ हा दिवस असाच आणीबाणीचा असून, कोरियाच्या शोकपूर्ण कथेंतील एक पर्व आज संपत आहे. आजपासून दोन दिवसांनीं ( जानेवारी २५ ) चार बड्या राष्ट्रांचे प्रमुख प्रतिनिधी बर्लिनमध्यें जमणार आहेत. त्यांच्या बैठकींतून जें कांहीं निष्पन्न होईल त्यावरून जगाचें गाडें कोठें झुकणार तें ठरणार आहे. त्यानंतर लगेच जानेवारी २६ आपल्या गणराज्याच्या संस्थापनेचा दिवस. हा आनंदाचा दिवस गेलीं २४ वर्षें ऐतिहासिक महत्त्वाचा म्हणून गणला गेला असून, आपल्या देशानें ज्या महान् कार्याकरितां वाहून घेतलें आहे, तें कार्य मनोभावानें पार पाडण्याची प्रतिज्ञा करण्याचा तो मंगल दिवस आहे. त्यानंतरचा ( जानेवारी ३० ला ) येणारा दिवस म्हणजे ज्या दिवशीं आपल्या राष्ट्रपित्याचें बलिदान झालें तो. आपल्या राष्ट्रपित्याच्या सांगण्याप्रमाणें आपण किती वागत आहोंत याचें आत्मसंशोधन करण्याचा हा दिवस.— या महत्त्वपूर्ण घटना व अर्थपूर्ण घडामोडी अशा विलक्षण रीतीनें मिळून आल्या असून, आजच्या जगाच्या स्थितीचें प्रतिबिंब त्यांतून दिसून येतें. अनेक अनावर शक्ती आपणांला नाना बाजूंनीं ओढीत आहेत. एका बाजूला गांधीजींनीं जीं तत्त्वें आपणांस शिकविलीं त्यांच्या पक्क्या आधारावर, आपण श्रद्धा व आशा यांचें बळ बाळगून आहोंत. दुसऱ्या बाजूला भीति, द्वेष, हिंसा यांचे वादळी वारे आपल्याभोंवतीं घोंघावत असून ते आपणांस उमळून टाकायला सज्ज झाले आहेत. अशा प्रकारें अनेक परस्परविरुद्ध शक्ती आपणांस सैरावैरां ओढीत असतां, वर्तमानकाळच्या तीक्ष्ण धारदार कांठावर उभे राहून आपला तोल सांभाळणें अत्यंत कठिण आहे. परंतु सुदैवानें गांधीजींनीं दिलेली प्रेरणा अजूनहि आपल्या अंतःकरणांत आहे. जरी मधूनमधून त्यांच्या शिकवणीचें आपणांस विस्मरण पडत असलें तरी, त्यांच्या त्या प्रेरणेचा प्रकाश अजूनहि आपल्या हृदयांतून प्रकाशत आहे...

' साधनांचें समर्थन साध्यांवरून होत नाहीं ' हें आपल्या गुरूचें महान् तत्त्व आपण कधींहि विसरणें शक्य नाहीं. जगांतील लोक हें तत्त्व विसरले आहेत आणि आपलें उद्दिष्ट साध्य करण्याकरितां कोणत्याहि साधनाचें समर्थन करीत आहेत. आजच्या जगाच्या संकटाचें हेंच खरें कारण आहे. लोकशाहीच्या समर्थनार्थ, किंवा 'स्वातंत्र्या'च्या नांवाखालीं, असें कांहीं कुंद वातावरण निर्माण झालें आहे कीं, त्यांत लोकशाही व स्वातंत्र्य हीं गुदमरून जाऊन मृत्युपंथाला लागलीं आहेत !

—श्री. जवाहरलाल नेहरु. 'कल्याणी'(२३।१।५४)






